भारत-इतिहास-संशोधक-मंडळ, स्वीय ग्रंथमाला क्र. ७१

# आंग्रेकालीन पत्रव्यवहार







शांताराम विष्णु अवळसकर

## शिवचरित्र कार्यालयाचे शिवचरित्रविषयक ग्रंथ

ह्या तीनहि ग्रंथांत इंग्रजी, डच, पोर्तुगीज, फारसी तसेंच संस्कृत, कानडी; हिंदी या भाषांतील श. १३४८ ते श. १६०४ ( इ. १६८२ एप्रील ) अखेरपर्यंत पत्रांचा राजकीयदृष्ट्या विस्तृतपणें मराठींत काढलेला सारांश दिलेला आहे. अर्थातच मराठी पत्रें ह्यांत घेतलेलीं आहेत हें सांगणें नको. इ. १९३७ पर्यंत जेवढीं ह्या ७।८ भाषांमधून इतस्ततः पत्रें म्हणून प्रसिद्ध झालीं त्यांचा सारांश कालानुक्रमानें ह्या भागांतून प्रसिद्ध झाला आहे. पत्रें व तीं कालानुक्रमानें लावलेलीं असणें याहुन इतिहास अभ्यासकास दुसरी महत्त्वाची गोष्ट नाहीं. अशीं पत्रें ह्या तिन्ही भागांत अंदाजें तीन सहस्र आलीं आहेत. शिवाय तिसऱ्या भागांत अकबर, जहांगीर, शहाजहान, औरंगजेब ह्या बादशहाच्या कारकीर्दीचीं जुलूस-वर्षें म्हणजे त्यांच्या कारकीर्दीच्या प्रत्येक वर्षाचा प्रारंभकाल मुसलमानी व इंग्रजी वर्ष, महिना, तारीख असा दिला आहे. ह्या सर्वांपेक्षां शिवकालीन शकावली—पृष्ठें सुमारें १५० दिली आहे. पृष्ठसंख्या ९७०. किं. भाग १, २; प्रत्येकी रु. ३॥, भाग ३ रु. २॥.

**शिवचरित्र निबंधावली**—ह्या ग्रंथांत श्री. द. वि. आपटे, प्रो. पटवर्धन, प्रो. कुंभारे, प्रो. देशपांडे, प्रो. ओतुरकर, श्री. वि. वि. काळे, श्री. शं. ना. जोशी, श्री. वा. सि. बेंद्रे, रा. सा. गं. के. देशपांडे ह्यांचे मुख्यतः तत्कालीन पत्रांचे आधारें शिवचरित्रांतील प्रसंगावर लिहिलेले निबंध आले आहेत. पृ. ४१२, किं. रु. ३॥

**शिवाजी निबंधावली भाग १**—ह्या ग्रंथांत प्रो. काणे, प्रो. पेंडसे, श्री. रा. राजोपाध्ये, प्रो. सबनीस, श्री. य. खु. देशपांडे, श्री. वा. आ. देशप्रभू पेडणेकर श्री. ज. स. करंदीकर, म. म. गौरीशंकर ओझा, प्रो. दांडेकर, बॅ. प्रो. पुणतांबेकर श्री. भट, श्री. शि. का. ओक-धार ह्यांचे शिवकालीन संस्कृति व धर्म; गागाभट्ट, शिवाजीची कौटुंबिक माहिती, राजनिति, संतांची कामगिरी, शिवजन्मदिननिर्णय श्रीसमर्थ रामदास, शिवकालीन विदर्भ, शिवाजीचे कुलोपाध्याय, ( शिवकालीन सिद्दस निजामशाही व आदिलशाही सुलतान परिशिष्ट ) इत्यादि निबंध आले आहेत. पृ. ३०० किं. रु. ३॥

**शिवाजी निबंधावली** भा. २ मध्यें प्रो. आगा हैदर हसन-अहलीनामा, दा. वि. गोखले शिवकालीन प्रवासी पिटर डेला व्हॅले, प्रो. कुलकर्णी—शिवकालीन भाषा प्रो. देशपांडे मोडी लिपी, श्री. भि. वि. वैद्य—मराठ्यांच्या ९६ कुळींच्या याद्या, मराठे व [illegible], श्री. ग. ह. खरे-शिवकालीन राजपत्रलेखन, श्री. बेंद्रे जंजिरेकर सिद्दी श्री. [illegible]. ह. घोरपडे-शिवाजी व तत्कालीन मराठे प्रतिस्पर्धी, श्री. शि. ग. पवार, शिव-कालीन ज्योतिर्गणित; प्रो. भानू प्रतापगड युद्ध, प्रो. माटे शिवकालीन समाजस्थिति; प्रो. पोतदार-अण्णाजी दत्तो वंशावळ हे निबंध आले असून प्रो. भूयान (गोहत्ती)—'आसामी ऐ. साधन व शिवाजी महाराज,' प्रो. श्रीनिवासाचार्य (मद्रास)—शिवाजीची दक्षिणेकडील स्वारीची भूमिका, रा. ब. डॉ. अय्यंगार (मद्रास) दक्षिणेतील मराठी सत्तेचा उदय, प्रो. रामचंद्र दीक्षितार (मद्रास) शिवाजीविषयीं कांहीं नवीन साधनें प्रो. वर्मा—मुहमदनामा हे लेख इंग्रजींत आले आहेत. पृ. ३००; किं. रु. ३

भारत-इतिहास-संशोधक-मंडळ, स्वीय ग्रंथमाला क्र. ७१



# आंग्रेकालीन पत्रव्यवहार





शांताराम विष्णु अवळसकर



शक १८७० ] मूल्य ३ रुपये [ इ. स. १९४८

# थोडेंसें प्रास्ताविक

आमचे मित्र श्री. शां. वि. आवळसकर ह्यांनीं संपादलेल्या " आंगरेकालीन पत्रव्यवहाराचा " हा लहानसा खंड वाचकांचे हातीं देतांना मला अत्यंत आनंद होत आहे. श्री. आवळसकर ह्यांची मराठी इतिहासाच्या वाचकांस नव्यानें ओळख करून देण्याचे कारण नाही. सुमारे ८ वर्षांपूर्वी त्यांनी मंडळांत प्रवेश केला आणि आपल्या शिवचरित्र–साहित्य खंड ९, चौल-अधिकारी दप्तराचे रुपानें उत्तर कोकण प्रांतात अजून कितीतरी मोलाचें साहित्य प्रकाशनाची वाट पहात संशोधनाभावी तसेच पडून राहिलें आहे ह्याची थोडीशी चूणूक दाखवून दिली. या खंडाबरोबरच कै. दत्तोपंत आपटे स्मारक मंडळामार्फत त्यांचा " आंगरेकालीन अष्टागर " हाही ग्रंथ बाहेर पडला व प्रादेशिक इतिहासाचें एक महत्त्वाचें अंग त्यांनीं लोकांच्या नजरेस आणून दिलें. आतां आंगरे-कालीन पत्रव्यवहाराच्या ह्या खंडातून त्यांनी चौलच्या अधिकारी दप्तरांतील त्यांनी आंग्र्यांच्या इतिहास परिपोषाक अशीं बरीच कागदपत्रें पुन्हां एकदां प्रसिद्ध केलीं आहेत. त्यांचें राजकीय व सामाजिक महत्त्व संशोधक ठरवितील. यामुळें श्री. आवळसकर ह्यांनी कोकणच्या इतिहासाची साधनें जमविण्याची मंडळाची जबाबदारी अंशत: तरी पार पाडली असें म्हणण्यास आतां मुळींच हरकत दिसत नाही. आज मितीस अलिबाग तालुक्यांत असें एकही गांव नाही की जेथील कागदपत्रांचा सुगावा लागून तेथील कागदपत्र त्यांनी हाताळले नाहीत, व महत्त्वाच्या कागदपत्रांच्या नकला मंडळाकडे रूजू पाहाण्यास पाठविल्या नाहीत ! प्रादेशिक इतिहासाचें अशा तऱ्हेने महत्त्व ओळखून त्या त्या प्रांताच्या इतिहासाचें संशोधन करण्यास जिल्हा–निहाय–किंवा प्रांत निहाय लहानशीं संशोधन मंडळें स्थापन झालीं तर हें कार्य अधिक जोरानें पुढे चालवितां येईल असा मंडळास विश्वास वाटतो. कारण अशा प्रादेशिक इति-हासावरून राष्ट्राच्या मोठ्या इतिहासाच्या रचनेस सहाय्य मिळू शकतें. इंग्लंड-सारख्या चिमुकल्या देशांत देखील प्रत्येक परगण्या परगण्यातून अशीं लहान लहान मंडळें आहेत व तीं आपलें कार्य यथाशक्ति नेटानें पुढे चालवित अस-तात. मग भारतासारख्या मोठ्या खंडांत अशा मंडळांची आवश्यकता अधिक आहे यांत नवल काय !

चिटणीस भा. इ. सं. मंडळ पुणें

# प्रारंभादाखल

आंगरेकालीन पत्रव्यवहाराचा हा खंड भा. इ. सं. मंडळाचे द्वारें प्रसिद्ध होत आहे. आंगऱ्यांच्या इतिहासाचा एक साधनग्रंथ ' आंगरेकालीन अष्टागर ' गतवर्षी प्रसिद्ध झाला; त्यास हा खंड पोषक होईल असा विश्वास वाटतो.

प्रस्तुत पुस्तकांतील बहुतेक पत्रें चौलच्या अधिकारी दप्तरांतील आहेत. अगदीं मोजकीं ४।६ पत्रें अलीबागचे रा. केशवलाल मोदी यांजकडील असून, १।२ रा. एम्. जी. कुळकर्णी यांजकडील आहेत. हीं पत्रें प्रसिद्ध करण्यास अनुमति दिल्याबद्दल रा. अधिकारी, रा. मोदी व रा. कुळकर्णी यांचा आभारी आहें.

आंगऱ्यांचा इतिहास म्हणजे स्वतंत्र हिंदुस्थानच्या सागरी सत्तेचें यथा तथ्य भव्य वृत्त, असें समीकरण मांडून जर कोणी या पुस्तकाकडे पाहूं जाईल, तर त्यास निराश व्हावें लागेल. या पुस्तकांत आरमारी अगर युद्धविषयक हालचालींची, बातम्यांची पत्रें अत्यल्प आहेत. पण, आंगरेकालीन अनेक सामाजिक प्रश्न कसे सोडविले गेले, याचें दिग्दर्शन येथें बरेंच होईल.

आरंभीचे १५ लेख इ. स. १५०० पासूनच्या अनेकविध रीतिरिवाजांची, उत्सवांची माहिती देत आहेत. अनेक गांवांस नवीं नावें कशीं प्राप्त झालीं, मुख्य धंदा जो शेती त्याचे प्रगतीस पोषक असे कोणते ठळक प्रयत्न झाले, यांबद्दल पुष्कळ माहिती या पुस्तकांत सांपडेल. कुळकर्णी वतनाचा अष्टागरांतील इतिहास थोडक्यांत, पण योग्य शब्दांत ले. ३ मध्यें आढळेल. पोर्तुगीजांनीं रेवदंडा व कोर्लई हीं ठिकाणें आपल्या ताब्यांत आणल्यानंतर तेथें कोणती परिस्थिति उत्पन्न झाली, याची बरीच हकीकत १ ल्याच लेखांत व आणखी कांहीं लेखांत आढळेल. चौलचे वतनदार देसाई, देशकुळकर्णी व अधिकारी यांचे शिवाजीशीं आलेले गोड अगर कडु संबंध १ ल्याच लेखांत निर्दिष्ट झाले आहेत. चौलची देशमुखी पेशव्यांनीं अखेर कशी विकत घेतली, याबद्दलची हकीकत येथें व ले. ८८ वर भरपूर आली आहे. अधिकारी घराण्यांतील अनेक पुरुषांनीं छत्रपति पेशवे व आंगरे यांची एकनिष्ठपणें सेवा केली; त्याची यादी व चाकरीचें स्वरूप ले. ४ मध्यें दृष्टोत्पत्तीस येईल. थोडक्यांत असें म्हणतां येईल, कीं प्रस्तुत पुस्कांतील १ ते १५ पर्यंतचे लेख सामाजिक व आर्थिक इतिहासाच्यां दृष्टीनें अत्यंत महत्त्वाचे आहेत.

कोंकणच्या इतिहासांत एतद्देशीय व फिरंगी यांच्या संबंधाच्या कागदपत्रांस वेगळें महत्व आहे; कारण पोर्तुगीझांचा हिंदुस्थानांतील इतिहास म्हणजे धार्मिक आततायीपणा व तामस क्षात्रवृत्ति यांच्या पाशवी स्वरूपाचें अनावृत प्रदर्शनच होय. एकादी सत्ता प्रबळ होत असतांना तिचें परिणामकारक आक्रमक स्वरूप दृष्टीस पडत असतें. तशा आक्रमणांत जर विधायक कार्य करणारी

प्रवृत्ति दृग्गोचर होत असली, तर ती भावी राजनैतिक इतिहासाचें प्रमुख सूत्र बनत असते व तीच इतिहासास परम उज्वल स्वरूप प्राप्त करून देण्यास समर्थ होते. पण प्रबल सत्तेच्या आक्रमणांत पाशवी विघातकपणाच सामावलेला असेल, तर घडून येणारा इतिहास स्पृहणीय कसा व्हावा? त्या विघातकतेमुळें संस्कृतिसंघर्ष वाढतो; जित आणि जेते यांचेमध्यें कायमची तेढ उत्पन्न होते आणि वारंवार छळ सोसावा लागणारे जित, दौर्बल्यामुळें नसल्यासारखे दिसले, तरी राजसत्तेचे, मनांतून कायमचे वैरी होतात. फिरंगी व एतद्देशीय यांचे संबंध अशा प्रकारचे आहेत. या पुस्तकांत फिरंगी व एतद्देशीय यांच्या संघर्षाचे सूचक असे कांहीं महत्वाच्या मजकुराचे कागद आले आहेत; त्यांत लेख १, १०, ४२ व ४६ उल्लेखनीय आहेत. त्यांतील ४६ वा युद्धविषयाच्या दृष्टीनें महत्वाचा असून बाकीचे तीन सामाजिक इतिहासाचे दृष्टीनें अभ्यसनीय आहेत.

छत्रपति संभाजीच्या कारकीर्दीत १६८३ मध्यें पोर्तुगीस व मराठे यांचें युद्ध कोर्लई व व रेवदंडा येथें सुरू झालें. या युद्धाची विस्तृत हकीकत उपलब्ध नाहीं; फक्त सरदेसाई स्मारक ग्रंथांत प्रो. पिसुर्लेकरांच्या लेखांत त्याचा थोडा उल्लेख असून 'आंगरेकालीन अष्टागरां'त संभाजीच्या रेवदंडकडील हालचालींचा सुगावा सांपडतो. याबाबत जास्त प्रकाश टाकणारें पत्र या पुस्तकांत ले. ४२ म्हणून छापलें जात आहे. त्याचा इत्यर्थ असा कीं, थोरल्या छत्रपतींच्या कारकीर्दीत परधर्मांत गेलेल्यांचें शुद्धीकरण अपवाद म्हणून कां होईना होऊं लागलें. तसें शुद्धीकरण होत राहणें अवश्य होतें; कारण, साष्ट–बारदेश व कोर्लई–चौलकडे फिरंग्यांनीं धार्मिक आक्रमण करून प्रजेस त्रस्त केलें. स्वधर्मांत परत यावें असें त्यांस वाटे. छत्रपति संभाजीच्या कारकीर्दीत या प्रश्नास चालना देण्याचा प्रयत्न झाला व वसई आणि रेवदंडा ताब्यांत आणण्यापूर्वी मराठ्यांनीं तसा प्रयत्न करावा, अशी या पत्रांत स्पष्ट विनंती आहे. इ. स. १७३५ मधलें हें पत्र सामाजिक इतिहासाच्या दृष्टीनें उद्बोधक आहे.

बाकीच्या पत्रांचा सारांश आतां विषयावर सूचित करितों.

राजकीय–(१) इ. स. १७०२ मध्यें औरंगजेबाचा कोंकणांतील अंमल नष्ट होऊं लागला व मराठ्यांच्या आरमाराचा सरसुभा कान्होजी आंगरे उत्तर कोंकणांत प्रबल होऊं लागला. जंजिऱ्याजवळील पद्मदुर्ग किल्ल्यावर यावेळीं मराठ्यांचा हवालदार सुभानजी मोहिते जागृत राहून हालचाल करीत होता व सागरगडचे आसमतात कान्होजीचा जम बसला होता. त्यांनीं बामणगांव हा पायथ्याशीं असलेला गांव जाळून उजाड केला. नंतर मोगल व मराठे यांनीं सदर गांवास कौल देऊन पुन्हा वस्ती करण्यास परवानगी दिली. (ले. १८ पहा.) (२) इ. स. १७०४ मध्यें कान्होजी मराठ्यांच्या आरमाराचा सरसुभा आहे (ले. १९ पहा). (३) संभाजीच्या कारकीर्दीत चौलकडे अधिकारी

पदावर असलेला मराठ्यांचा अमलदार रायाजी सदक प्रभु इ. स. १७०४ मध्यें साकसे ( पेणजवळ ) परगण्याचा अधिकारी झाला. त्याचे मार्फतीनें बहिरोपंत पिंगळे पंतप्रधान यांनीं पद्मदुर्गचा खर्च भागविण्यास दोन गांव नेमून दिले ( ले. २० पहा ). ( ४ ) १७०१ ते १७०८ पर्यंत कान्होजी आंगऱ्यांचें महत्व पश्चिम किनाऱ्यावर सारखें वाढत होतें. मराठे, हबशी व मोगल यांचा तितर्फा अंमल रेवदंड्याच्या खाडीपासून रेवस–धरमतरच्या खाडीपर्यंतच्या प्रदेशावर होता. या प्रदेशांत सोगांव, वहिरोळें व बेलोली हे तीन गांव मोगल व कान्होजी आंगरे यांच्या दुतर्फा अमलाखालील होते. तेथील वसूल मराठ्यांना फक्त मिळाला, मोगलांस मिळाला नाहीं. तेव्हां वसूल करणाऱ्या सरकारी नोकरांस मोगलांनीं कैद केलें. नंतर दंड भरून त्यांची सुटका करण्यांत आली ( ले. २४ पहा ). ( ५ ) इ. स. १७३३ मध्यें चौल आंगऱ्यांच्या ताब्यांत होतें. तेथें शांतता नांदत होती; पण बाजीरावानें जंजिऱ्याच्या मोहिमेस प्रारंभ केल्यानें शिद्दीच्या प्रदेशांत राजपुरीस गडबड उडाली. अशा परिस्थितींत, व्यापारी व रयत यांनीं धास्ती न बाळगतां आपला उदीमव्यवसाय जलस्थल–मार्गानें सुरळीत चालू ठेवावा, असें अभयपत्र आंगऱ्यांनीं दिलें ( ले. ३९ पहा ). ( ६ ) इ. स. १७३९ मध्यें मराठे व पोर्तुगीज यांचें युद्ध अटीतटीवर आलें. पोर्तुगीझांचा कोंडमारा व्हावा म्हणून कोर्लई–रेवदंड्याकडे हालचाली सुरू झाल्या. त्याबाबत ले. ४६ चा उल्लेख पूर्वी केला आहे. वसईची मोहीम संपल्यानंतर मराठ्यांनीं कोर्लईस वेढा दिला तो किल्ला घेतला त्यावेळीं रेवदंडच्या प्रजेची पळापळ होऊं नये म्हणून पेशवा नानासाहेब यानें अभयपत्र दिलें ( ले. ४९ पहा ). (७) इ. स. १७५६ च्या फेब्रुआरींत मराठे व इंग्रज यांच्या संयुक्त आरमारानें व सैन्यानें तुळाजी आंगऱ्यांचा पराभव करून त्यांस कैद केलें व विजयदुर्ग तात्पुरता इंग्रजांच्या हातीं पडला. तो पेशव्यांना परत करण्यांत इंग्रजांनीं दिरंगाई चालविली. १७५६ च्या जून महिन्यांत मराठ्यांच्या हालचाली सावनूर, चित्रदुर्ग, सोंधे, हरपनहळ्ळी इत्यादि कर्नाटकच्या भागांत होत होत्या व मराठे तुंगभद्रेच्या कांठच्या प्रदेशांतून खंडणी वसूल करीत होते. त्यावेळीं, विजयदुर्ग इंग्रजांनीं परत करावा, म्हणून मुंबईचा गव्हर्नर रिचर्ड यास लिहिलेलें पत्र ले. ६५ म्हणून छापलेलें आहे. त्यावरून, मराठे जमिनीवर जबरदस्त असले, तरी इंग्रजांस त्यांचें भय वाटत नसल्याचा प्रत्यय या पत्रानें आपणांस येतो. (८) इ. स. १७५८–५९ मध्यें मराठे व हबशी यांचें युद्ध पुन्हा सुरू झालें. त्यावेळीं निरनिराळ्या किल्ल्यांवरून माणसें आणून सैन्य भरती करण्यांत आली, हें ले. ६८ वरून समजतें.

महत्त्वाचीं राजकीय पत्रें येथें दिग्दर्शित केलीं; पण सूक्ष्म दृष्टीनें पाहणाऱ्यास आणखी कांहीं पत्रांतून राजकीय मजकूर निस्संशय आढळेल.

सामाजिक—( क ) मंदिरें–‘ आंगरेकालीन अष्टागर ’ मध्यें मंदिरांची माहिती पुष्कळच आली आहे. तीस पोषक असा मजकूर या पुस्तकांत कांहीं लेखांतून आला आहे. (१) कनकेश्वरची यात्रा पूर्वीपासून भरे. फिरंगाण, वरघाट व अष्टागरांतून व्यापारी यात्रेस येत. उंदेरीच्या हबशी हवालदाराच्या देखरेखीखालीं असलेल्या प्रदेशांत हें मंदिर असलें, तरी येथील उत्सव यथापूर्व चाले. १७४३ मध्यें, यात्रा भरावी ह्मणून दिलेला कौल लेख ५५ म्हणून येथें छापला आहे. (२) रामेश्वरच्या मंदिराबद्दल ले. ६६ व ७४ मध्यें मजकूर आला आहे. रामेश्वर मंदिरास अर्पण केलेली वाडी गुरवाच्या सुपूर्त व्हावी ह्मणून केलेली खटपट ले. ६६ मध्यें आढळेल. ले. ७४चें राजकीय व सामाजिक असें द्विविध महत्व आहे. मुंबई, साष्टी, वसई, कल्याण, भिवंडी, राजापूर इत्यादि दूरच्या ठिकाणांहून रामेश्वरच्या यात्रेस व्यापारी लोक येत. मंदिर आंगऱ्यांच्या प्रदेशांत असल्यानें यात्रेचा बंदोबस्त आंगरे ठेवीत. पण आंगरे व पेशवे यांचा शत्रु हबशी, याशीं युद्ध सुरू असल्यास पेशवे व आंगरे एकमेकांस सहाय्य होत. त्यावेळीं पेशवे आंगऱ्यांच्या प्रदेशांत अधिकार चालवीत व आंगरे, प्रसंग ओळखून तो चालू देत. पण शांततेच्या काळांत पूर्वीच्या अधिकारक्षेपाचे दाखले जर पेशवे दाखवूं लागले, तर ते मान्य करावयाचे नाहींत, असा आंगऱ्यांचा योग्य रिवाज होता. ले. ७४ मध्यें आंगऱ्यांची ही भूमिका स्पष्टपणें ध्यानांत येते. ( ३ ) चौलच्या चंपावती व नारायण या दोन मंदिरांच्या इनामांबद्दलचा मजकूर ले. ६७ व ७० मध्यें आला आहे.

( ख ) बागायताची पाहणी—आंगऱ्यांचे प्रदेशांत ठरीव काळानंतर सरकारी रीत्या पाहणी करण्याची पद्धति होती. १७२२ मध्यें चौलच्या बागायताची पाहणी झाली. बागायत निकृष्ट स्थितींत होतें. उत्पन्न वाढावें म्हणून निरनिराळ्या पिकांबरोबरच, ताग पेरला जावा म्हणून आंगऱ्यांनीं खटपट केली आहे. ( ले. २८ पहा. ) इ. स. १७१८ मध्यें एकदां पाहणी होऊन गेल्याचें ले. ३२ वरून दिसतें. ले. ३३ स्पष्टपणें निर्देशित करितो कीं, १७२८ मध्यें चौल बरेंच ओसाड पडलेलें असून भरभराटीस आलेलें नव्हतें व तें भरभराटीस यावें म्हणून आंगऱ्यांचे प्रयत्न सतत चालले होते. ले. ४७ इ.स. १७३९ मधला आहे. त्या वर्षी तपे झिराडची पाहणी झाली.

( ग ) जोशी व उपाध्ये यांची वृत्ति–ले १६ वरून जोशी व उपाध्ये यांच्या वृत्तीचा बोध होतो. इ. स. १७०१ मध्यें चौलचा मुसलमान हवालदार महमदखान यानें जोशी व उपाध्ये यांस दंड केला. चैत्रशुद्ध प्रतिपदेस पंचांग सांगावयाचें व वर्षफल सांगावयाचें, ही रीत पुरातन आहे. पण प्रथम पंचांग कोणाकडे सांगावयाचें, हा प्रश्न महमदखान हवालदारानें उत्पन्न केलेला दिसतो. चौलचे जोशी व उपाध्ये यांची या बाबतची रूढी ठरून गेली होती. प्रथम

जमीनदारांकडे व नंतर सरकारी अधिकाऱ्यांकडे पंचांग सांगावयांचें, असा क्रम पूर्वापार चालत आला होता. निजामशाही व मराठेशाहींत हा क्रम पाळला गेला. महमदखानाचें म्हणणें बहुशः असें असावें कीं, आपण सरकारी अधिकारी; तेव्हां प्रथम पंचांगवाचन आपणांकडे व्हावयास पाहिजे. तें न झाल्यानें त्यानें दंड ठोठावला. अर्थात् या अन्यायाविरुद्ध दाद लावून घेणें जोशी व उपाध्ये यांस भाग पडलें व निर्णय ठरला कीं–देसाई, अधिकारी, देशपांडे व प्रमुख जमीनदार ग्रामस्थ यांजकडे पंचांग सांगणें झाल्यावर मग तें सरकारी अधिकाऱ्यांकडे सांगण्यांत यावें. दंड परत करण्यांत आला. ले. २६ वरून आगरकर जोशी व बेल्हावकर जोशी यांच्या वृत्तीच्या विस्ताराचा व तपशिलाचा फार चांगला बोध होतो. या प्रकरणीं ले. ७७ महत्वाचा आहे.

राघोजी आंगरे संस्थानाबाहेर असले म्हणजे त्यांची मुलगी बयाबाई कारभार पाही. इ. स. १७६९ मध्यें खार चऱ्ही येथील ग्रामोपाध्यांनीं स्वतः वृत्ति चालविली नाहीं. त्यांच्या गैरहजेरींत दुसऱ्या ब्राह्मणास बोलविण्यांत आलें. त्यास झालेल्या उत्पन्नांत ग्रामोपाध्याय हिस्सा मागूं लागले. त्यावरून त्यांस ताकीद देण्यांत आली.

( घ ) अधिकाऱ्यांचे मानपान:—चौलचे अधिकारी शिवकालांत व शिवोत्तर कालांत मोठे जमीनदार व पंचकुळवंशी माळी जातीचे मानकरी पुढारी होते. त्यांच्या मानपानाचा उल्लेख ले. १७ व २३ मध्यें आला आहे. त्यांना दत्तविधानाचा शेला देण्यांत येई. प्रायश्चित्तप्रसंगीं त्यांस शेल्याचा मान होता. लग्नादिकार्यप्रसंगीं ब्राह्मणादि जातींत सुद्धां त्यांस मानपानाचे हक्क असत. हक्क सरकारजमा झाल्यास ते सोडवून घेण्यासाठीं त्यांचा अविरत प्रयत्न असे.

( ङ ) चौल शहर धामधुमीमुळें उध्वस्त झाल्यावर अनेक घराणीं देशावर गेलीं व त्यांचा चौलशीं संबंध उरला नाहीं. त्यांनीं आपल्या जमिनी नंतर विकल्या, दान केल्या, अगर त्यांवरील आपला हक्क सोडल्यामुळें त्या सरकारजमा झाल्या. इ. स. १७५६ मध्यें राघो कृष्ण पुराड या गृहस्थांनीं आपलें चौलचें बागायत दान केल्याचें पत्र ले. ६४ म्हणून छापलें आहे. अशीं दानपत्रें वहिवाटीस आणण्याची जबाबदारी ग्रामस्थ व जमीनदारांवर असे. मुतें घालण्याचा प्रकार ले. ६२ मध्यें आला आहे. अनेक प्रकारच्या कलहांत गावांच्या शिवेचें भांडण बरेंच प्रमुख दिसतें. सहाण व ढवर या दोन गावांच्या शिवेचा निकाल जमीनदारांनीं करावा म्हणून ले. ५३ मध्यें आंगऱ्यांची आज्ञा आहे.

( च ) व्यापार—चौल येथील रेशमी कापड विणण्याचा व्यवसाय पुन्हा ऊर्जितावस्थेस यावा, म्हणून आंगऱ्यांनीं केलेला प्रयत्न ले. ४१ वरून समजतो. विणकरांस सरकार–देणें दर मागास सालीना तीन रुपये असे. मानाजी

आंगऱ्यांचे वेळीं अष्टागरचा व्यापार सुरतेपर्यंत चाले. ब्राह्मणहि व्यापार करीत. आंगऱ्यांचें दस्तक ही आवश्यक बाब होती. ( ले. ५२ पहा. )

( छ ) पांचकळशी माळी–अधिकारी घराण्याबद्दल स्वतंत्र उल्लेख वर केला आहे. हें घराणें अणजूरच्या नाईक घराण्याची एक शाखा होय. पेशवाईच्या मध्याह्नकालांत नारायण नाईक अणजूरकर हे या समाजाचे कोंकणांतील प्रमुख होते. ते जातीय वादग्रस्त प्रश्न सोडवीत व न्याय देत. रेवदंडा, चौल, साष्टी, वसई, मुंबई या भागांतील सर्वजण त्यांचे व अधिकाऱ्यांचे आज्ञेंत वर्तत. ( ले. ५८ व ६० पहा. )

( ज ) फिरंगाणांत बरेच दिवस राहून आलेला मनुष्य जातिबहिष्कृत मानला जाई. त्यास अपंक्त ठेवण्यांत येई. त्याचा न्यायनिवाडा होऊन मग त्यास जातींत घेतलें जाई. ( ले. २५ पहा. )

( झ ) कोळी–कोळी लोक दर्यांत मासळी मारीत. त्यांस सरकारांत महसूल भरावा लागे. पण त्यांच्या उपजीविकेचें साधन नष्ट झाल्यास त्यांस सूट मिळे ( ले. ५७ पहा ). चौल, रेवदंडा व थेरवंडा या तीनही गांवचे कोळी समुद्रांत आपला उदीम करीत. १७४० नंतर रेवदंडा पेशव्यांकडे आलें व चौलच्या कोळ्यांस स्वतंत्र समुद्र किनारा राहिला नाहीं. त्यांचा व्यवसाय मारून टाकण्याचा प्रयत्न पेशव्यांनी केल्याचा दाखला ले. ७५ मध्यें सांपडेल.

याशिवाय, खंडो बल्लाळच्या घराण्यांतील चौलच्या सरदेशमुखीबद्दलचे उल्लेख, बामणगांव व तपे उमटे येथील देशकुळकर्णाबद्दलचा मजकूर, खंडाळ्याच्या पाटीलकीची हकीकत व आणखी अनेक विषयांचें वृत्त या पुस्तकांत प्रसिद्ध होत आहे. त्यायोगें आंगऱ्यांच्या उत्तर कोंकणांतील राजवटीबद्दल आपलें ज्ञान जास्त स्पष्ट होईल, असा विश्वास वाटतो.

'कोंकणच्या इतिहासाचीं साधनें' संशोधून खंडशः प्रसिद्ध करण्याचा माझा मनोदय आहे. आंगरेकालीन पत्रव्यवहाराचा हा खंड प्रसिद्ध करून, भारत इतिहास संशोधक मंडळानें माझें ओझें थोडें हलकें केलें याबद्दल मंडळाचा फार फार आभारी आहें. पुस्तकांत प्रसिद्ध होत असलेले कागद रुजु पाहण्याचें काम रा. शं. ना. जोशी यांनीं केलें. इतिहास संशोधनाच्या कामीं प्रा. रा. वि. ओतुरकर, डॉ. मो. गं. दीक्षित, रा. चिं. ग. कर्वे व रा. ग. ह. खरे यांचें साह्य मला नेहमींच होतें; तसेंच या पुस्तकाबाबत झालें आहे. त्या सर्वांचे आभार मानतों.

अलीबाग
१८ फेब्रु. १९४८

शांताराम विष्णु आवळसकर

# आंगरेकालीन पत्रव्यवहार

ले. १ | शके १५५३ | इ. स. १६३१

मामले मुर्तजाबाद उर्फ चेऊल

मुा इसने सलाशीन व अलफ ( नि. अक्षर ) पथत व दस्तुरात पूर्वी चेऊल आबाद असतां हकीकत वगैरा हकीकती तो

चेऊल प्रांतास गडकोट नव्हते सागरगड उर्फ खेडेदुर्ग होता चेऊल शाहारांत हवेलीनजीक हवेलीवाडा बाबत इबसखान हुजुर बाछाई जवलोन हाकीम फौजदार चेऊल सुभेयाचा अमल चालवावयास रवाना करावा तो चेऊल प्रांतास दाखल जाहालियाउपर आवेराई व तळे मिलकत देशाई हे ठिकाणी तुर्मान चौथा आहे ते ठिकाणी येऊन उतरावें त्याजवर शाहारात पेगांम पाठवावा त्याजवर देशमुख व अधिकारी व देशकुलकर्णी व सेटे महाराज मोख्तासर बाऊन हकीमांची मुलाजमत घेऊन शाहारास आणून बाछाई हवेलीमधे राहावें सोबत जमावलोक सिपाई आसामी पनास साठ व येक पालकी येक घोडा हे रीतीने ठाणे येऊन बाछाई अमल करावा कलम १

तिसरे साली दुसरा मुलकाचे जमाबंदीचा दस्तुरात मुलकाचा मलिकअबरी देणे बरकुम रकमाला गावाचे गाव व सेताचे सेत व वाडीया व खारिया रकम प्रमाणे वसूल रयेतीने जमीदारांच्या मोहयानें करावा साल दरसाल पाहाणी सचणी प्रयोजन नाहीं मश्ता रयेतीने भरोन दिल्हा म्हणजे रयेत आपआपले घरी सुखरूप नांदत होती ज्याज फर्मावीस वेठ बेगार कानुकेफूत अनुमात्र रयेतीस तसदिया नव्हता जमीदार व रयेत येकदिल कारभार चालत होता हे प्रमाणे दस्तुरात पूर्वीचा चालत होता १

माणीक चावडी नजिक पोखरण सैदमीरां वलि व हवेली इबसखान हे ठिकाणी माहांलोमाहालची जकात जमा होत होती ते चाहुडीस लोक कांसार शाहारात पांचसातसे कराचलि त्यांचे जमावाची होती तेही बलकुवत गनिमाई जाली तर शाहार राखांवे व चावडीस चौकी पाहारेयास पालीप्रो लोक ठेवावे त्यांचे चाकरीवर नजर देऊन त्यांस देणे माहासूल व जकात व कानुकेफूत येक जरा नांही १

---

* 'हकीम चौथे' असे तेव्हांच ओळीवर लिहिले आहे.

बाशाई हाकीम शाहार मजकुरीं आलियावर वर त्यानजीक जमीदार मुल्की मामिलेयासी रुजुवात होऊन दस्तूरमोजीब मुलकाचे आबादानीचा मुदा हासील करावा त्यास तो हाकीम जमीदाराची अर्जी कबूल न करी रयेतीस इजा द्यावा तेव्हा जमीदार येंही हाकीमास द्वाई बाछाची व द्वाहीं शेराची देऊंन मुदा हासील करावा त्यासही मानीत नांही तेव्हा जाहाली हकीकत जमीदार येही हुजुर बंदगीस वकाया लेहून पाठवावा ऐसाजे फलान हाकीम मामले मजकुरीं रवाना केला तो फलान तारीखेस शाहार दाखल जाहाला त्यास आम्ही जमीदार मुलकी मामिलेयांसी रुजुवांत होऊंन पेसजीचीं कानुकैफत जकात माहासूल दस्तुर मोजीब वाकीफ केला त्यास ते बांतेस मानीत नाहीं बेदस्तुर करोन रयेतीस इजा देत आहे येणेकरून रयेत तजावजा जाहाली आहे म्हणोन बंदगीस वकाया अर्जदास्त ल्याहावयास जरूर जाणून लिहिले असे त्यास रयेतीचे हालावर नजर देऊंन हा हाकीम त्यागीर करोन दुसरा हाकीम रवाना करावयास हुकूम फर्मावणार साहेब आलंमपन्हा दिन दुनयाचे गौर करणार साहेब धनी माबाप आहेत बादज हे हकीम रहेसे मुल्क बेचिराख होईल ऐसा वकाया हुजूर पाठऊन हुजरून दुसरा सुभा आणऊन यास त्यागीर करावें हे दस्तूर बाछाई अमलात चालत होता कलम १

बाशाई अमल माजी जाहाला त्याजवर सिवाजी राजे यांची कारकीर्द जाहाली तेव्हां सुभे सुभां नामजाद लोकां ठाणे ठाणेयास जमाव ठेविले ते समई मुलकांतून माहासूल कांहीं नकद व कांही अेनजिनस गला घेत चालले त्याजवर जजिरे खांदेरी १६०१ सवसरीं वसविली त्याजवर १६०२ सवसरी कुलाबेस पाया घातला तेच सवसरीं महाराज कैलासवासी जाहाले सके १६०१ सवसरी हबसी जजिरे राजपुरी येहीं उंदेरीस पाया घातला अमल संभाजी राजे सिवाजीचे लेक यांची कारकीर्द जाहाली तेहीं नवसाले राज्यें केले तैपासोन गडकोट खादेरी उदेरी कुलाबा राजकोट किल्ले चेऊल प्रांती जाहाले गडकोटास जमाव लोकांस अडिसेरी असावी म्हणौन मुलकांतोंन अेनजिनस पाहाणी प्रोमात वसूल करोन व ज्याज फर्मावीस छावणी बांस गवत काथलचुडी व वेठबेगार रयेतीस जाहाली जे समई जें मांगतील तें रयेतीने द्यावें १

बाछाई शाहार आबाद होतें ते समई श्रावणी पौर्णिमेस चेऊलचा नारल रेवदंडा नेऊन सागरात टाकावा त्यास पूर्व दिवसीं माहालीहून अमलदार येणेंहे फिरंगीयास पेगाम पाठवावा अैसाजे उद्यां चेऊलचा नारल रेवदंडेयास येईल असे सांगोन पाठवावें त्याजवर फिरंगी येणेंहे रयेतीस ताकीद करोन चेऊलची स्वारी नारलासोबत येईल त्यास मार्गी झाड पान खांदीखुदी तोडून मार्ग साफ करणे कसबे चेऊल येथील मोहतर्फी कुलें याजवर पटी करून पैका चावडीस जमा करोन त्याचा खर्च चावडीचे सिपाई व ठाणे नाईक व कलावंती वगैरा

व खालुकर्णाचा ते दिवशीं आपले भूशणासारिखा खर्च करावा व नारळाचीं झाडें बेगडीं सें सवासें रेशमी गोंडे याचीं करावीं त्यापैकीं एक चेऊळचे हाकी-मांस नजर करावें व येक झाड ठाणगे व महालकरी व पानसरा येहीं रेवदंडा शाहारचा कपितान यास नेऊन द्यावें तेण्हे असर्फी दाहा एकूण रुो ५८ पांच इनांम देऊन पानाच्या पट्या देऊन पाटवावें व पेंठ गडगा व पेठ हुसेनाबाद व नवे नगर येथून बेगडी नारल २ व कसबे चेऊल नारल २ यो च्यार नारल माणीक चावडी येथे पूजनं करोन हकीमाची श्वारी व सेटे चोघरी व कोंत( वाल )......येखलक व घोडे असवारसमेत खालुकर्णाची रेवदंडा जाऊन नारल सागरांत टाकावा तेथून श्वारी फिरोन येते समई रेवदंडा येथील जमाव व राशनांचे तलेयापावेतों इस्तकबाल पोहचवीत येऊंन मुकादम भंडारी यांचा याचे हातोंन पनास बिडे तेंही देऊंन माघारे जावें आपली श्वारी हकी-मानजिक जाऊन मजुरा करावा आण पानाच्या पट्या श्वारीस व सेटे कांसार व चोघरी पानसारे कोतवाल ठाणेनाईक यांस द्याव्या १

कसबे मजकुरीं भाद्रपदचे चौथीचीस गणपती मुहूर्ती होत होत्या त्या देवालये पुस्करणीस कौलासावयास जात होत्या व सिवाजी राजे यांचे अमलांत माहाल मजकुरी सुभेदार होते त्यांकडील गणपती कौलासास येत होते त्यास प्रथम आरती चोघरी यांचे गणपतीस आजपरयेंत चालत आहे हें सर्वांस दखल असे १

मा। चेऊल येथील पाखाडिया १५ पघरा असतां फिरंगी येण्हे रेवदंडा वखार घालोन उदीम व्यापार करीत असतां हिरे कंकर माणिक मोती व कपडे व हमाचीच बाछाई पसंन पडे ते वस्तु बाछाईस पाटऊन बाछा खूश करोन घेतला फिरंगीयाचें येहसान जाणून त्यास हुकुम फर्माविला ऐसाजे तुझे खाती-रेस येईल ते आम्हानजिक तलब करोन मागावें दिल्हे जाईल त्याजवर तेण्हे गाईचें कातडेया बराबर जमींन बक्षीस करावी म्हणोन मागितले त्याजवर बाछा येही हास्येविनोद करोन जमींन दीधली फिरंगी येण्हे त्या कातडेयाच्या सुताप्रो वाधी करोन जागा घेतला तेथे कोट बांधिला त्यामुळे तीन पाखाडिया कबज करोन ते ठिकाणी राज्य करीत असतां चेऊल येथील हाकिमाची कैद रेवदंड्यास

चेऊलचा नारल बंदरांवर जात आहे ते ठिकाणीं लक्ष रुपयाचे ज्याज येऊन सिकस्ता जाहालें तर तो मालमता चेऊलचे हाकिमाने आणावा १

व नारल पडते ते ठिकाणी फिरंग्याचे राज्यात देवधर्म करावयास मनाई असे म्हणून ते ठिकाणी मान्हास्ट यातीने येऊन दानधर्म सुख(रु)र करावें रेवदंडा कोण्ही खुण करोन नारलाचे ठिकाणी आला तर फिरंगी याचा जोरा चेउलास नाही

या खेरीज मांडवीनजिक कोट येथे चेऊलाचा निवी (सिदगा) बाऊन ······खुटवा व जकात साछाई अमलात चेऊलाकडे जमा होत होता त्याजवर जकात खेरीज करून गोवियाहून आरमार सालदरसाल येत होते त्यास तनखेदार कुलाबा व राजकोट येही कारकून नेऊन खुटवा आजपरयेत घेत होते हाली रेवदडा पेसवे यांचे श्वाधीन जाहलीयापासून राहिले रेवदडा येथील मैसी चेऊलास चरगणीस प्रतेही येतात त्यास दर मैसीस सालिना रुा ।। देत होता १ खार दिघी येथील माहासूल मलिकधरी रुा १०० येकसे कुलाबा राजकोटी पावत होत्या १ आदमपीर नजिक अस्टमी मोराळे येथीळ बाजाराचीं गलबतें भरत होतीं त्याची मोहताद देत होता पेसवे यांचे रेवदडें जालियापासोन केद चालत नाही

चेऊलाचा नारल रेवदडा बात होता तो राहिला १ मेची(सी)ची वण राहिली १ खार दिघी येथील मा॥ राहिला १

कान्होजी आगरे यांचा अमळ कुलाबेयास जाहालियापासोन हस्त कचील गोवें तहद श्री द्वारका जलमार्गास सावकार लोक व कोली मछीमार व उदमी व्यापारी येही कुलाबाचा कौल घेऊन आपआपले कसब करावे कौल न घेतला त्यास धरून आणून दंड करावा १

फिरंगी रेवदडा होता ते समई शाहारातील लोक यांचें लग्नटका व दत प्रायेचिताचा पैका कुलाबेस देत होते येथील शा बाछायांचा अमल माजी जाहाला त्याबवर सिवाजी राजे यांचा अमल जाहाला याजवर माहाराज रायगडचे मुकामीं अमल करावयास लागले ते समंई चेऊलचे इसम भेटीस गेले

कृस्णाजी माहादेव देशाई बावाजी विटोजी अदिकारी
दादाजी माहादेऊ देशपांडिये रंगाजी रूपाजी सबनीस

सदरहु जाऊन राबदर्शन घेतलें त्याजवर भोरोपंत पेसवे येही चेऊलचे मुलकाची पुर्सीस केली तेव्हा मुलकाची बमा वसूल देशकुलकर्णी याचे हातोन पधत पाहातां मुलकात पटी करून हाकीमास दखल केली त्याजपैकीं कांही वसूल केला कांही बाकी राहिली त्याजवर तो हाकीम त्यागीर होऊन दुसरा हाकीम पैवस्ता जाहाला त्यास मागीळ बाकी साकी देशकुलकर्णी येहीं हजम केला असें कलम त्याजवर शाबूत करून अटक करोन ठेविले देसाई अदकारी याकडे काही वजा हेच कलम लागू होत नाही तेव्हा त्यास निरोप देऊन बिदा केले ते समई दादाजी देशकुलकर्णी येहीं उभयेतांस म्हणो लागले कीं तुम्ही आम्ही वतनभाऊ असोन मज टाकून जाऊ नका तेव्हा पुना माहाराजा दरबारीं बहुत वजाने रदबदल केली परतु आईकत नाही त्याजवर निरोप दिल्हा येतसमई देशकुलकर्णी येही उभयतास बोलिले कीं तुम्ही मज टाकून जाल तेव्हा जीव

त्याग करीन त्याजवर हुजूर वारंवार रदबदली करितां हुजरून इतराजी फर्मावून तिघा जणास अटक करोन त्यांस खड केला वसरी लाहारी

७५०० देशाई
७५०० अदिकारी
१५००० देशकुलकर्णि
---
३००००

येणेप्रो खंड करोन अटक केली त्याबवर नारायेण सेणवी इंगरेज मुंबैयाबकडून वकील होता तो किले मजकुरी आला होता तेण्हे देसकांस मुदत करोन पैकेयास जामीन होऊन सोडऊन घेऊन आला मुदतेप्रमाणे पैका वसूल केला हे हकीकत त्याहावयास कारण जे देसकुलकरणी या निमित्ये देशाई अदकारी फसले त्याजवर कितेक (मु)दती शिवाजी कैलासवासी जाहाले सभाजी राजे येही नव सालें राज्ये केलें त्यां मागोंन पुंडावे जाहाले मुलुक वैरान जाहाला बादब बाछाई ठाणें राजकोटास आलें मुलुक बेचिरास त्याजवर सरखेल कुलाबेयास दाखल जाहालियापासोन चोरचिरिट फुड तमाम धास्तीने घांट माथा सुगम केला सरखेलसाहेब येहीं तामसपण अति उतकट राज्ये केलें जलमार्गी व खुसकी वरधाट जफ्तकरितां त्यास आणून लास यावे सोटेयाने मार देऊन टाकावें व दावणी घालोन मनुशे मारावीं त्यावर चेऊलचे देसक दर्शन घेऊन वतन अनभवास आणावें[१] त्यास राजकोट येथील हाकीम रजा देत नाहीं वतनदारीचा पेशा आपला मुदा मतालिब मुलुकगिरीचा शराब बाछाची द्वाही देऊन मुदा हासील करावा हे बात तुमची ते दरबारीं पसंन होणार नाहीं जीव वाचतां सकट त्याजवर सुभा कल्याण भिवडी येथील जमीदार येऊन टकातोहपा खाऊन दरबार रुजु केलें तेण्हेकरून आपला हक मुशारा चालता केला चेऊलचे देसक भेटीस न गेले म्हणोन इतराजी फुर्माऊन म्हणो लागले कीं मी कान्होजी वाघ बकरीस येक भागालीं पाणी पाजोन जलमार्ग श्री द्वारकापर्येत व गोमातक वगैरां व खुसकीने घाट परयेत जेरजफ्त करून तमाम जमीदार व सावकार हलाली हरामी आमच्या दरबारीं रुजु जाहाले असतां आमचे किलेयाचे माचींचे जमीदार रुजु नाहीं तेव्हां हरामखोर जाणून त्यांस मारिले जाईल त्यास ते धास्तीने राजकोट धरून राहिले त्याजवर ताजुदीन अलीखानं यांचे अमलामधे तिघे गोविंद कृस्ण देशाई व आपाजी अदिकारी[२] व माहादाजी देशकुलकर्णी त्रिवर्ग जजिरे राजपुरीस जाऊन सिदी सुरुलखान याचे दरबारी मेहेनत येक वर्ष केली त्याज-

---

१ [ ले. १९ पहा. अधिकारी कान्होजीच्या भेटीची अपेक्षा करतात. ]
२ [ ले. २२ पहा. त्यांत सविस्तर पोषक हकीकत. ]

वर सर्फदीन मदखान वाकेनवीस यांचे घराणे कुरविव तेव्हा ताजुदीन अली-खान येही भावास इशार केली ऐसीजे हबसियांकडून जो सरजाम होईल ते मोजीब आम्हास करावा लागेल मुलकाची चौथाई हबसियाकडे व चवथाई आम्हाकडे अैसी इशारत केली या वादब कुरविव बुधीने देसाई व अदकारी[1] यांस निरोप दिल्हा की तुम्ही घरी जाणे फार दिवस जाहाले घरची खबरदारी करोन येणें अैसे बोलोन घरीं पाठविलें मागोन माहादाजी देसकुलकर्णी यांची नवाजीस करोन जंजिरे तर्फेन भात खंडी १० व राजकोट तर्फेन भात खंडी १० मुकर करून सनद देऊन मुलकाची जमाबंदी करोन यावी त्याजवर देसाई अदकारी ज... *

...न विदा केले त्या उपर रा रघुनाथजी सभाजी आंगरे याकडून कुलाबेयास आले त्यांनजिक देशाई आदकारी देशकुलकर्णी येही रदबदल आपले वतनाचीं सांगोन राजश्री मानाजीबावा यास हरकावयास सांगितले त्यावरून मान्ये करोन सदरेस दिवटी ज्वाहार जाहालियावर तिघे जमीदार अर्जास उभे राहिले ते समई रघुनाथजी येहीं अर्ज केला आणि लघुज्याणाक्ष्यातील स्लोक दाखले म्हणोन अर्थ समजाविला कीं महाराज राजेलोकी आपले राज्याचें अभीष्ट व आपले औलादेचे अभीष्ट जेण्हे इछावें तेण्हे वतनदाराचे वतन मोडों नये त्याची स्थापणुक करोन ज्याचा विभाग त्यास दिल्हेयानें आपले राज्याची वृधी आहे यैसे शास्त्रार्थ आहे त्यावरून राजश्री साबाजी तुकाजी प्रभु यांस मानाजीबावा येंही आज्ञा केली की हे गोस्टीचा अपवाद आम्हाकडेस नाहीं आपपासोन तुम्हास एकंदर हुकूम जे हे वतनदारांचा सेर मजकडे ठेऊं नका आमचा सेर यांजकडे जाऊ देव नका ये(णे)प्रो आज्ञा केली यावर वतनदाराचे हातोन पघतप्रो सेवा घ्यावी म्हणोन रयेतीस ताकीदपत्र दिल्हे अैसे जें आज्ञापत्र राजश्री मानाजी आंगरे जजिरे कुलाबा ता पाटेल व मोख्तासर व रयान देहाये सुभा मामले चेऊल सुहुर सन खमस[2]

---

१ [ ले. २२ पहा. ]

[ * येथवर क्रमानें सहा पानें झालीं पुढील एक पान नष्ट झालें आहे. पण त्या पानावरील मजकूर संदर्भानें पुढीलप्रमाणें आहे. प्रथम अधिकाऱ्यांनीं साताऱ्यास जाऊन छत्रपतींची भेट घेतलीं. बाजीराव, चिमाजी आपा, पिलाजी जाधव आणि जिवाजी खंडेराव यांची गांठ घेतली; कांहीं दिवस छत्रपतींची सेवा केली. नंतर छत्रपतींनीं सांगितलें कीं आपल्या सेवेची येथें अवश्यकता नाहीं. आपण परत सरखेलांकडे जावें. तेव्हां उपरिनिर्दिष्ट व्यक्तींकडून अनुकूल पत्र मिळवून अधिकारी कुलाब्यास आले. पुढें ले. ३४, ३५, ३६, ३७, पहा. ] २ येथें "समान" पाहिजे.

सल्लासीनं मयां व अलफ राजश्री आबाजी गोविंद देशाई व बाळाजी आपाजी अधिकारी' व बाळाजी माहादेव देशकुलकर्णी मामले मजकूर यांस वतनी सेवा सांगितली आहे त्यास तुम्ही पाटेल व रयेत यासी रुजुवात राहोन मुलकी सुती संचणी कामकारभार यांचे माहुमातीने करोन हुजुर येऊन विदित करीत जाणे बाणिजे हे प्रा। सनद देऊन तिघा जमीदारास वर्गे दिल्ही त्याजउपर किनेकां दिवसीं रा। त्रिंबक माहादेव डबीर चेऊलकर दिमत कुलाबा येहीं आबाजीपंत देशाई यांचे गळां पडोन म्हणो लागले की तुमचा पिता गोविंदराऊ यांस आम्हास देशमुखीची मुतालकी देऊं केली होती ते हाली आम्हास देणे त्यास तेहीं उत्तर केलें की कैलासवासी खडो नारायेण दिघे आमचे पिते त्यांस वतनाची मुतालकी गोविंदराऊ येहि दिल्ही तेंव्हा मब दत येही दिल्हे असे असें असोन ते आपले लेखनपत्र तुम्हास दिल्हे असेल तें दाखऊन दावा करा लेखपत्र नाहीं तेंव्हा तोंडच्या गोस्टी मसमू पडणार नाहीं त्यानंतर आबाजी देसाई यांसगे वैर करून येबमानास अनेक रीतीने गैरवाका समजाऊंन सांगोन यांस खांदेरीस अटक करोन ठेवावें असा हत्यार्थ केला हें वर्तमानं भगवान स्वरूप राजश्री दीक्षितबावा गोसांवी येही चेउलास आबाजीपंतास पत्र लेहून पाठविले की तुम्ही देंखतपत्र पलोन घाटावर जाणे नाहींतर खांदेरीस संकट प्राप्त होईल ते पत्र पावताच देसाई मशारनिले पलोन घाटावर गेला पुन्हा हे स्थली पाईं लागत नाहीं म्हणून पेसवे यांकडे वतन विकत द्यावें म्हणोन करारी केली हे वर्तमान राजश्री कोलटकर व रामाजी बाबा यांकडून कुलाबेयास मुसदी यांस इशारत जाली. परतु कोण्ही मनास आणून त्यास दिलदिलास देऊन वतनवार आणावा हे गोस्टी(चा) अनादर जाहाला तेंव्हा तेण्हे निरुपाये जाणून करजदार जाहाला तेंव्हा तेण्हे पेसवे यांस प्रथम तीन तक्षिमा दिल्हे आण सालिना मोईन रु॥ ५०० करोन घेतली कितेक साले जाहली त्यास कुलाबा तर्फेन वतन भोगवटीस पडत नाहीं तेंव्हा मोईनही बंद जाहली त्याजउपर करजबाजारी जाहाला उदरवृत्ति न चाले यामुळे आणखी द्रव्ये घेऊन सारे वतन स्वाधीन केले

---

ले. २      श्री      श. १६५४<br>इ. स. १७३२

सन सलास सलासिन शके १६५४ सवसरी रा। बाजीराव पेस(वे) जजिरेया(स) वेढा घालावयास आले' राजपुरीस तळ देऊन तमाम गडकोट

---

१ [ ले. ४५ संदर्भादाखल पहा. ]

२ [ याबाबत रा. खं. २, पृ. ७७; आंगरेकालीन अष्टागर, पृ. ११; पे. द. ३३, ले. १३६, कु. गॅ., पृ. ४४५ पहा., का. सं. प. या., ले. २२ पहा. ]

घेऊन जजिरा व पदमदुर्ग राहिला तेव्हा सुला (ह) करोन मुलकाचा तह केला

| निसबत पेशवे माहाल | निसबत हबसी जजिरे राजपुरी |
|---|---|
| १ तो विरवाडी | १ तो मांडले |
| १ तो घोसाळे | १ तो नांदगांव |
| १ तो तळे | १ तो मेसळे |
| १ तो निजामपूर | १ तो दिवें |
| ॥· तो गोवेळ | १ तो सिवर्धन |
| १ तो गोरेगाव | ॥· तो गोरेगाऊ रजु गोवेळ |
| ५॥ | ५॥ |

येकूण अकरा माहाल दुतर्फा जमाबंदी वसूल वासूल होऊन आखेर-साली सदरहु अकरा माहालाचे दस्त एकत्र करून यैवज मुबादला बराबरी वाटून घ्यावें.

---

ले. ३ } श्री {

मामले मुर्तजाबाद उर्फ चेऊल–हकीकत

पूर्वी बाछाई अमल होतां ते समई प्रात चेऊल हे प्रातास गांव कुल-कर्णी वतनी नव्हते आपले खासगत गांवागावास दोनच्यार गांव मिलोन हुजदार ठेऊन त्याचे हातोन लिहिणेयाचें काम घेऊन त्यास मुशारा नकद लारी मुकरर करून देऊन चाकरी घ्यावी त्यास उतरकत नाहीं अथवा त्यांचे मनास येत नाहीं त्यास दूर करोन दुसरा हुजुरदार यावें त्याउपर मराठे यांचा अमल जाहला अैन जिनस वसूल सरकारी घेत चालले तेव्हा दर खडीस भात अदमण हुजुरास यावे ते फसल हगामी पाटेल रयेतीचे दारीं फिरोन भात जमा करून कुलकर्णी यास यावें त्याजवर सरखेल साहे-बांचा अमल जाहाला तेव्हा विसाजीपंत मुतसदी दफतर यांनजिक कुल-कर्णी येहीं फिर्याद केली ऐसी जे पाटेल गांवामधे घरोघर फिरोन मुशारेयाचे भागोला करितां कोण्ही थोट व कोण्ही मुफलिस नादारी व याखेरी (ज) चाकर-माने लोक मुशारेयांचें भात देत नाहीं तेव्हा आपलें पोट भरत नाहीं आपणास बिन मुशारा चाकरी करून दफतरीं मोबदा देवत नाही आपण हुजरून कार-कून ठेवावा त्याजवर कागदपत्र कुलकर्णी मढोन देत नाही तेव्हा येनदस्त त्याजवर पटी व मुशारा कुलारगावर बसऊन कोठीस वसूल घ्यावा मुशाराचा यैवज गांवी हरयेक कुळापासोन घ्यावा येसा सिरीस्ता तो हाली चालत आहे कुलकर्णी

| | | |
|---|---|---|
| मा। नागांवे | मा। आगसी | मा। वरसवळी |
| १ | १ | १ |
| मा। थळ | मा। आवास | |
| १ | १ | |

सदरहु माहालास कुळकर्णी काहीक मुदत वतनीप्रमाणे चालत आहेत याखेरीज माहालांचा तपसील आबाजी माहादेऊ सरसुभेदार दिमत कैलासवासी रा। सिवाजी राजे सन खमस सितैन व अलफ ते साली तह करोन तपे तपेयास कुलकर्णी ठेवावयास आज्ञा केली त्याउपर रयेत निसबत हुजदार असतां

दताजी नारायेण येण्हे जमीनदारांचे अर्जाव करोन तो। श्रीगाव व तो। पाल कुलकर्ण चालवीत आहेत दताजीचा पुतलाजी याचा मूल बालकृष्ण पुतलाजी व त्याचा कुटुंबी निलाजी व धोंडजी १

तो। उमटे व तो। बाम्हणगाव येथील कुळकर्ण मल्हार नारायेण व विठल नारायेण येही वतनदाराचे आर्जव करोन त्याचा दस्त ऐवज कबज करोन त्याजवर हाली रा। रामाजी मल्हार चिटनीस दिमत पेसवे येहीं येजमान श्रामीचे सामर्थ करून रा। सेकोजी आगरे व मानाजी आगरे व हबसी व मोगल औरंगाबाद देखीलबाछाई सदा काढिल्या राजपत्रें व पेसवे यांकडील पत्रे काढिली

माहाल आगर येथील कुलकर्ण वतनी नव्हे ते त्या उपर सन खमस सितैन व अलफ हे साली पुतळाजी माहादेव पानसारा बंदर माडवी माहाल चेऊल येण्हे प्रबलास जाऊन रा। आबाजी माहादेव सरसुभेदार

सिदी हिलाल किलेदार जजिरे उदेरी यांचा अमल जेरदस्त व रा। मानाजी आगरे जजिरे कुलाबा यांचा अमल जबरदस्त यांचे आज्ञेखेरीज ज्याज फर्मावीस कारवाई अनुमात्र चालत नव्हती ते समई विसोपंत मुतसदी जजिरे कुलाबा येही हबसी याचे आर्जव करोन कुलकर्ण मागीतले

| | |
|---|---|
| तो। झिराड मा। १ | तो। परहूर १ |
| मा। केहीम १ | मा। सासवने १ |

हरदू माहालास हुजदार रयेतीचे निसबतीने चालत होते त्याजवर किलेदार उदेरी येही जजिरेयास हुजूर लेहून पाठविले कीं विसाजीपंत मुतसदी कारकर्दा दफतर व मुळुकगिरी त्याच्या श्राधीन आण खावदाचा कुल येख्तीयार त्यांबकडेस आहे खावद पसन आहेत त्यास सदरहु माहालाचे कुलकर्णपणाची सनद मऱ्हामत जाहाली तर आपले हुतर्फा मुलकांत सरकारतर्फेचे संदी व ऐवज मुबादला व कितेक जमाबंदीची कामे खलखल पडतांत याकरितां मशारनिलेस कुलकर्ण वतन दिल्हेयाने

माहालानिहाये तळ कोकण दिमंत रा सिवाजी राजे छेत्रपति यांचे आर्जव करोन आगरचे कुलकर्णपणाची सनद घेतली

कलम १

माहाल कसबा येथीळ कुलकर्णी वतनी नाहीं ताफे ताफे यास कारकून ठेवावा आपणास न पुर्वे तर त्यास दूर करोन आणखी ठेवावा

| | |
|---|---|
| ताफे सोनार १ | ताफे कासार १ |
| ताफे गौळी १ | ता। दुकानदार १ |
| ता। तेली वगैरा १ | जिरायेती हुजदार १ |
| ता। कोळी १ | |

आपला अमल सुत सचणी सुरळीत चालेल पंत मजकूर आपला येहसानवंद होऊन जे काम पडेल ते उगऊन देईल हे रजा हुजूर आर्जव करून दरबारखर्च व दिवाणखर्च देऊन जजिरे राजपुरीन सनद व त्यामोजीब जजिरे कुलाबा येथील सनद हरदू माहालांची घेतली

कलम १

येण्हे प्रो चाल(त) होते हाली जिरायेतास व बागाईतास व मोहतर्फा यास कुलाबा तर्फेन स्वचत्र कुलकर्णी त्यास मुशारा सरकारचा देऊंन जमा वसूल चालत होतां व राबकोट दिमत मोगल यांतर्फेन

| | |
|---|---|
| कसबे यास | आगरास |
| बाबाजी दामाजी | आगराचा कुळकर्णी |

हरदुजणास सरकारचा मुशारा देऊन जमा वसूल चालत होता राबकोट कुलाबा तर्फेस आला येकतर्फा जमाबंदी जाहाली त्यास हाली रा। त्रिंबक माहादेव डबीर व भावजी जनार्दन यांचे इस्टत्वामुळे डबीर येही रा। मानाजी बाबा यांनजिक अर्ज करून त्रिंबक गोविंद हवालखानी यांस कसबेयाची जिरायेद बागाईत लिहिणे करोन हक मुशारा ग्यावा म्हणौन सनद काडिली आहे

कलम १

सदरहु कुलकर्ण शेके १६९५ सन खमस सबैन मयां व अलफ राजश्री राघोजी आगरे सरखेल याचे अमलात सिवाजी बाबजी इब्न बाबजी दामाजी वसैस लकड काम सोटे यावर वि॥ रा। प्रधान आहे त्यास पेसवे यांकडील सागवानी सोटे कुलाबाकरास अरमारचे कामास साल दरसाल देतात त्यामधे अमलदार कारकून उतम प्रवीने देईल त्याजवर दृष्ट देऊ(न) साळमजकुरापासोन कसेब याचें कुलकर्ण सरकार तर्फेन दिल्हे कलम १

ले. ४

श्री

मामले बादशा ( बाद ) उर्फ चेऊल हकीकत.

अदिकारी प्रांत चेऊल यांचे घराण्यांतून राजसेवा केली तों

प्रतापजी वलद सोनांजी अदिकारी येहीं सिवाजी राजे छेत्रपति यांजकडेस सुभेगाची सेवा केली १

कृष्णाजी मांणकाजी अदकारी दिा ताजुदीन अलीखांन मोगल दिा बाछा निविसिंदगी ज्याहाजाईत व इमारत वगैरा कारखाना दफ्तरी सेवा केली १

विठल आपाजी अदिकारी प्रथम चाकरी राजकोट दिा मानाजी आंगरे वजारतमाब व किले राजकोट पेशवे यांहीं सिकस्त केला त्याजमागोन जंजिरे कुलाबेयास दरवाज्यास चाकरी सरनोंबतगी केली १

बाळाजी आपाजी अदिकारी मांमले मजकूर

प्रथम चाकरी दिा कान्होजी आंगरे सरखेल जंजिरे कुलाबा याचे दिमतीने सदर बारगीर सेवा केली.

त्याजमागोन सेवा बारगीर दिा रा बाजीराव बलाल प्रधान याची सेवा केली

त्याजमागोन ताजुदीन अलीखान दिवाण किले राजकोट यांचा सेवा केली

रावजी बाळाजी अदिकारी येहीं चाकरी तां

प्रथम चा दिा मानाजी आंगरे वजारतमांब जंजिरे कुलाबेयास दरवाजेयास केली १

त्याजउपर चा अवचितगड दिा पेसवे यांची केली १

---

ले. ५

श्री

चेऊल प्रांती नूतन नावें ठेविली

मौजे ताम्हंनई तों उमटें रामाजी देशाई मामले मजकूर ये येहीं गाव आपणा तर्फेस सरकारांतून घेऊन आबाद केला म्हणौन मौजें रामराज नांव ठेविले १ रकम—लारी १७०७८६॥

खार बोलाडी तों उमटें ताजुदीन अलीखान दिवाण चेऊल येहीं ते खार विकत घेतली तिचे नाव खार ताजपूर ठेविलें १ रकम—लारी ३७०

माहाल थल तों अस्टागर हे ठिंकाणीं बंदर किनारा भाट जागा होता तो मामुरा करोन नऊदर केलें त्याचे नाव नउदर रामराज सिलोत्री रामाजी देशाई मामले मार रकम—मलिकभचर लारी ३५०॥ ११ ।

मौजे वांहागांव हालीं मौजें चाहिरें ता। उमटे नांव कायेनिमित्य ठेविलें हे न कळे १

मौजे चेढरे ता। खाडालें हे गांवचे जमीन बंदर किनारा जागा भाट माळ होतें ते ठिकाणी जदीद लावगण करून बागाईत केले जेण्हे केलें तेण्हे नांव ठेविलें नउदर अलीबाग दरखवाद मौजे चेढरे सिलोत्री शाहा अलावदीन रकम—लाहारी १२५

मा। नागांवे ता। अस्टागर बागाईताखेरीज जमीन कोठार भाट रकम लाहारी १९८ ते जमीन कृस्णाजी मुडक ठाकूर अदकारो प्रांत चेऊल येही लावणे करोन अदकारवाडी व अदकार खारी नाव दाखला चालत असे १

खार पन्हा कसबे चेऊल सिलोत्री करीन हवसखान पाऊल देस फिरंगी पैकी रकम लाहारी ४०८ हाली ताजुदीन अलीखान दिवाण चेऊल येहीं चुनेगजी उपडी बांधोन मामूर केली तिचें नांव दिवाणखार म्हणौन ठेविले १

---

ले. ६ | शके १६७७ कार्तिक शु. २
इ. स. १७५५ नोव्हें. १५

मामले मुर्तजाबाद उर्फ चेऊल—हकीकत

मौजे चाविरें उर्फ वाहागांव ता। उमटें मामले मुर्तजाबाद उर्फ चेऊल मौजे मजकूरचे नजिक बंदरी पंचवीस खंडीचें तराडें येऊन शाकार व भात लाकूड फांटे कावाड अमदरफ्ती होती ते ठिकाणी जदीद खार बंदिस्त करें राजश्री साबाजी तुकाजी व रा। कृस्णाजी तुकाजी प्रभु कायेस्त कुलकर्णी मा। नांगांवे व मा। आगसी मामले मजकूर चिटणीस दिमत श्रीमत मानाजी आगरें वजारतमाब जजिरे कुलाबा सु॥ सीत खमसैन मयां व अलफ छ १० रोज माहे सफर उर्फ कार्तिक मौजे मजकूरचे गावठणाचे उतरेस दर्याचे खाडीचें नस्त व समग्र गांवचा डोंगराचा पाणलोट विन्हा त्याचें नस्त ऐसी गोडें व खारे पाणी याची नस्त येक ठिकाणी मिलाली ते स्थली चुनेगजी बंदिस्त करून बांधिलें त्याजवर गोडे पाणीयाचे बलें करून दोन वेळा बंदिस्त फुटोन गेली त्याजवर तिसरे मर्तबा बंदिस्त फेर केलियानी देश जाणार नाही साहून द्यावी ऐसा बहुताचे मते ठराव जाहाला त्याजउपर गांवाचे पूर्वेस खडक होता त्यास बेलदार व संकतरास व सुरंग लाऊन खडक फोडोन नदीचें पाणी याचा पल दक्षेणेस सांड केली बंदिस्त व इमारत मिलोन खर्च रुपये १०००० दाहा हजार जाहाले हे गोस्टीची शेर्ती व नामोसी श्रमुलकी परमूलको मशूर जाहाली प्रांतामधे जदीद खार व नउदर वगैरा नूतन ज़ाहालें त्याचा बयाज जमीदारी दाखलेयास लेहून ठेवावें हे दस्तुगात जाणून वेंबारिसी बेरकमी दर्यातील जमीन

काढून वतनी सिलोतर केलें तें जमीदाराच्या पेशाने लेहून ठेविलें त्याची नकल पेस्तर दाखल्यास असावी म्हणून मशारनिले येहीं लेहून मागितली त्यावरून लेख हस्ताक्षेर कृस्णाजी माणकाजी अधिकारी मामले मजकूर

---

ले. ७ } श्री { शके १६६१ / इ. स. १७३९–४०

मामले मुर्तजाबाद उर्फ चेऊल—हकीकती

खार कांचली दरसवा ('द) तों श्री गाव मामले मुर्तजाबाद उर्फ चेऊल सिलोत्री सैद माहामद मीर सैदी हमजां सेकीन कसबे चेऊल बारकुम रकमाला रकम मलिक अंबरी कदीम माहाल लाहारी १७५

सदरहु खार मजकूर बहुत मुदत खराबा दर्यागर्क व विन्हेगर्क व जंगल-गर्क असतां बेजारिसी जाणून हाली बंदिस्त कर्दे राजश्री साबाजी तुकाजी व राजश्री कृस्णाजी तुकाजी प्रभू कायेस्त कुलकर्णी माहाल नागावें मा आगसी व तो अस्टागर मामले मजकूर चिटनीस दिमत मानाजी आंगरे वजारत-माब जजिरे कुलाबा सुा [मो. बा.*] आर्बैन मयां व अलफ सदरहु बयाज हस्ताक्षेर कृस्णाजी माणकाजी अदिकारी मामले मजकूर मशारनिले येहीं आज्ञा केली असीजे खार मजकूर कदीम सिलोतर कोण्हाचें व महसूल रकम काये आहे तें लेहून द्यावें त्यावरून लेहून दिल्हे

---

ले. ८ } श्री { शके १६९५ श्रावण शु॥ १३ / इ. स. १७७३ आगष्ट १५

हकीकत राजश्री राघोजी आंगरे वजारतमाब सरखेल रा पेसवे यांचे भेटी जावयास निघाले श्रावण वद्ये त्रियोदसी रविवारी पोहनाडास मुकाम केले तेथून नागोठणेयास येऊन रा त्रिंबक विनायेक सरसुभेदार दिमत पंत प्रधान याच्या भेटी जाहाली यातेंही आदर करोन च्यार पांच दिवस राहाविले श्री गणेश चतुर्थी जाहालियावर रा माहादाजी विश्वनाथ मुतसदी दिमत वजारत माब यांस व रा विठोजी व दादजी अदकारी व रा पाडुरग बाबजी दिमत माहादाजी देसाई यांस नागोठणेयांस ठेऊन आज्ञा केली कीं तुम्ही येथे नागोठणेयास च्यार दिवस राहावोन चेऊल प्राताचे देसमुखीचे कागदपत्र सरसुभे यांस दाखऊन पुणेयास येणे आज्ञेप्रो राहिले त्याजवर माहादाजी प्रभु-येही अदकारी व पाडुरग रु॥ १० सरकारचे देऊन सरसुभा नजर करविली

सुमेदार यांचे बोटीवर मडली बैसली होतीं तेथू(न) माहादाजी प्रभु येही सुभेदार यास येकांती नेले आपण व पांडुरंग बावजी. यांस घेऊन खलबतात जाऊन वतनी कागदपत्र सरसुभेदार यांस दखल केले त्यांस देसाई अदकारी देसकुळकर्णी येका प्रांताचे जमीदार असोन अदकारी यांचा अनादर करोन त्यांस बाहीर बसऊन देसपांडे यांस येकांती नेऊन जाहाले वर्तमान कागदपत्राचे व भाशेणाचा अर्थ अदकारी यां अश्रुत असें न्याये नीतीने अनीत जाणून जाहाले वर्तमान लिहिले असे कलम

---

ले. ९ श्री { शके १६२८ माघ व॥ १०
इ. स. १७०७ फेब्रुवारी १६

हकीकत खार माहाल शाहापूर तो श्री गांव मामले मुर्तेजाबाद उर्फ चेऊल खार मजकूर राजक्रांतीं धामधुमीमुळे बहुत साले वैराण बेचिराख खराबा पडली होती त्यानउपर राजश्री कान्होजी आंगरे सरखेल जंजिरे कुलाबा यांच्या कारकीर्दीमधे छ २३ माहे जिलकाद सन सबा मयां व अलफ ई कौलनामे अजरवारी राजश्री कान्होजी आगरे ता गोंद पाटेल मुकादम व त्यांन माहाल शाहापूर तो श्रीगांव येणे प्रो कौल देऊन मामुरी केली हाली कोल पाटेल वलद गोंद पाटेल येणे कोटे पाटेल यास हक मुशाहिरा दस्ताप्रमाणे वाजिबी द्यावा ऐसें असोन कोण्हास मोहीन प्रो हात हुचलून द्यावे कोण्हास तोंडावेर मारून जबरदस्तीने न द्यावें हस्ता प्रो मारे खारीचा हक मुशारा आपण खात असतां कोटे पाटेल जजिरे कुलाबा फिरयाद गेले तेव्हां श्रीमत राजश्री राघोजी आंगरे येहीं राजश्री सावाजी तुकाजी चिटनीस व रा गोविंदसेट यांस न्यायाविशीं आज्ञा केलीं आज्ञेवरून रा कृस्णाजी व विठोजी अदकारी व रा पांडुरंग बावजी कारकून दिमत माहादाजी देशकुलकर्णी व बालाजी मल्हार कुलकर्णी खार मजकूर यांस हुजूर बोलाऊन आज्ञा केली कीं तुम्ही जमीदार खार मजकूरचा न्याई हुजूर आला असे याचे कागदपत्र दाखले आणून हुजूर रुजु करावे त्यास आज्ञे प्रो खार मजकूर येथील हक जाबिता मिरासदार मा माहाल शाहापूर तो श्री गाव मामले चेऊल सुा तिसा सितैन अलफ हक मुशारा पाटेल भांत केली मुदे

१। सेत खात नदी निसबत वेड पाटेल [redacted] पाटेल मुकादम
१॥ सेत डोल्हारा निसबत सोम पाटेल मुकादम
।- सेत देवसेत निा सोम पाटेल मुकादम
१८ सेत खोपणे निस(ब)त भांन पाटेल

१८ सेत खर नदी निसबत दाद पाटेळ
१। सेत ढेरण नि॥ गोम पाटेळ
१८ सेत झाड बुज़रूख निसबत पोस पाटेल
१। सेत रामथेवी नि॥ बांग भोईर
१८ सेत लढी नि॥ गोम पाटेल
॥। झाड खुर्द निसबत हर भगत
१॥ सेत पान्हेड नि॥ घुया पाटेळ
१८ सेत बाझाड नि॥ बाळ पाटेळ
१। सेत उदेस पोस पाटेल
८५ सेत नारंगी नि॥ लखम पाटेळ
२८ सेत भांगार नि॥ किते २
बांग माहात्रा १ खेद भगत १

१६८५

येण्हे प्रो पेशजींचे दाखले अदकारीं यांकडील या खेरी( ज ) पुरखु ! काकार कागद देशकुळकर्णी व खार मारचा कुलकर्णी रुजु जाले तेव्हा कोळ पाटेळ सेत नारंगी येथील कोटे पाटेल मुकादमीस लागू नाहीं यैसे खरे जाहाले सरखेल साहेबांचा कोळ आहे त्यामधे गैर मालुमात सांगोन मुकादम नांव ठेह-विले यैसा ठाव होऊन माहाळ मजकूर दर बिघा रु॥ ४ सरकारची हरखी घेऊन संदा द्याव्या असा करार पैका हरफेबंदी प्रो वसूल हिल्हे सन खमस सितैन मयां व अलफ ( निराळे हस्ताक्षर ) पूर्वील प्रथत बाछाई अमल होता त्यामागोन सिवाजी राजे यांचा अमल जाहला त्या मागोन रा॥ सरखेळ जजिरे कुलाबा खान जजिरे राजपुरी व मोगल किले राजकोट सदरहु कारकीर्दीचे कागदपत्र न्याई मनसुबी मुळे मुलकी गावाचें दस्त पाहोन खडीस रुपया अगर कमी हरखी घेतली असे हाली थापूरचे दस्तास बिघा रु॥ ४ घेतले हे बेदस्तूर नादुरुस्त गोस्ट केली कलम

---

ले. १० } श्री {

मामले मुर्तजाबाद उर्फ चेऊल–हकीकत
फिरंगी टोपकर यांची स्थले

गोवे १ पुर्तकाळ १ वसै १ ठाणे १
चदर दवण १ रेवदडें १ उरण १

हे स्थली राज्ये करीत असतां माह्रा(रा)स्ट धर्माचा द्वेश करोन आपले राज्यांत चालचलण

हेदु येही देवाळये न बांधावी १

मुसलमान येही मसीद न बांधावी १

लग्नासमई त्याचे माणूस मेहरणी मडपांत आणून त्याचे साक्षीने लग्ने लावावी १

घरी कोण्ही देवकार्ये केले तें कललियावर त्याचे घर लुटून त्यास देवकार्याचा अमलप्रमाणे दोन वर्षे तीन वर्षे गोंवेयास पाठऊन ठेवावें १

आपल्या घरी देवदेऱ्हारा मुहूर्ती पूजन कार्यास न ये १

तुलसी वृंदावन पूजन मनाई १

गृहस्त मृत्ये पावला त्याला मूल त्यास काका चुलते नाहीं माता असता त्या मुलास बाटवावा १

तवाखु दर सेर शा ·। ॥· प्रो लोताजवलोन विकत घ्यावा आणखी जागां परमुलकांतून पावसर अदसेर सापडला तर त्याचे घर मालिस्त करोन नागवावें १

हे प्रमाणे त्याचे राज्यातील चषत असतां हा उपद्रव जाणून बुगाजी नाई(क) व नारण नाईक अणजूरकर याती पांचकळसे येही राजश्री बाजीराव बलाल पंतप्रधान विमत श्रीमंत राजा शाहु यांजवळ येऊन त्यास(स)कल वृतांत विदित करोन त्याजवल कितेक वर्षे सेवा केली मलदये राज्ये मोडोन मऱ्हास्ट धर्माची वृधि करावी त्याजवर येत्न प्रेत्नात फार मुदत असतां कोट ठाणे प्रांत सास्टी याचे पूर्वेस खाडी आहे त्या खाडीमधे नाका पाहून खबरदारीस पानबु(रु)ज बांधिले आहेत त्या खाडीचे किना(रा) पूर्वेस मुलूक पेसवे यांचा आहे त्याजवर अणजुरकर येही आपले आयाती लोक चारकरी करार करोन त्यास गरीब कुलविशाचा मेष देऊन त्या सोबत गावींचा पाटेल देऊन कोंबडी व बकरीं व गडी गडें घेऊन ठाणे कोटास येऊन परवानगी आणून खासा कपितान कोट मजकूर याची भेट घेऊन त्यास सोगात नजर करोन अर्ज केला असाजे आम्ही रयेत आम्हास दखीनचा राजा बाजीराव यांकडील देणे मागणे वेठ बेगार फार दुख देतो तेथील अमलदार बहुतांचे साहेबीमधे आम्हास राहावत नाहीं साहेबांचे राज्यात रयेतीस कोण्हाची सता साहेबी नाहीं हे सुख जाणून गुरेढोरेसह वर्तमान साहेबांचे मुलकात येत असो त्यास खाडीचे पानबुरजास ताकीद करणे कीं आम्ही माणसें व गुरे आणून रात्रेसमई हाक पुकारा न करावा म्हणून ताकीद करावी

---

ले. ११ } {

[वंशावळ-चौळचा मुसलमान अमलदार ताजुदीन अलीखान याची]
मौजे दिवटब प्रा। वेसवीं दाभोळ येथील मुलना हुसेन १
त्याचा लेक सेख महमद मोतमनखान १
त्याचे लेके ताजुदीन अलीखान १ सर्फदीन माखान वाकेनवीस १

| याचे पुत्र | याचे पुत्र |
|---|---|
| १ गाजीसाहेब | १ महमद माजुम |
| १ हैदरसाहेब | १ बाकरसाहेब |
| १ मोतमतखान | १ अजमत सा |
| ३ | ३ |

---

ले. १२ } {

मामले मुर्तजाबाद उर्फ चेऊल
सुभा चेऊल हकीकत कारकीर्द रा। राघोजी आंगरे
[पहिला बंद दोन्ही बाजूस लिहिलेला गहाळ झाला आहे. दुसऱ्या बंदापासून सुरुवात.]

चेऊल प्रांती लोक मराठे वाडवल व आगरी व कऱ्हाडे कुलंबी वगैरा रयेत यांकडील जातीमध्यें गोतपरत्वें न्यायें मनसुबी जाहाली तर अदकारी प्रांत मजकूर यांचे घरीं येऊन न्याये गावांतील मोक्षासर व रयेत येऊन करावी ज्यास सज्या देणे त्यास त्याचा अनाचार पाहोन गोत दंड द्यावा तो

कोण्हापासोन बद (अ)मल जाहाला त्यास दिवाण दड होऊन उपरात देवदड प्रायोस्चित व गोतदंड देऊनं त्याचा सेलामानं अदिकारी येहीं ध्यावा हालीं भोगवटा चालत आहे , कलम १

कोण्हापासोन अन्नवेव्हारें करून भ्रस्ट जाहाला त्यास शास्त्रमतें व गोताचे आधारें तीर्थयात्रा अथवा दानधर्म अपराधप्रमाणे करोन उपरात गोतास जेवण करोन प्रायेस्चिताचा सेला अदकारी यांस द्यावा चालत आहे क(ल)म १

गोतामधें कोण्ही निपुत्रिक असतां वौशास दतपुत्र घेईल तेण्हे सरकारांत सेला देऊन आज्ञा घेऊंन उपरां(त) दतविधानांसमई अदिकारी यास सेला द्यावा १

ज्यापासोन चोरी जाहाली त्यास दिवाण दड होऊन सदरहु कलमेप्रमाणे गोतदड असावा कलम १

येणेंप्रमाणे प्रांतामधे पघत चालत असतां माहाद पाटेल व हास पाटेल व आनंजी पाटेल व बालकोजी पाटेल मौजे मालाडे तो उमटे व मुकादम गोत घरणे प्रांत चेऊल सुमे मजकूर सुा सबैन मयां व अलफ शके १६९२ विकृति नाम सवसरे वैशाक सुघ ३ त्रितीया मंद वार छ २ मांहे मोहरम दिल्हे वतनपत्र ऐसे जे तुम्ही हुजुर जजिरे कुलावेचे मुकामीं विनंती केली कीं आमची न्यात कऱ्हाडी प्रांत मजकुरी आहेत जो कार्येप्रयोजन करील तरी अगोदर मानं सरकारचें पांच विडे काढून ठेवावे उपरांत समेस गध विडे जाहालियावर पांच विडे सरकारचे अगोदर काढिले ते जे गांवी प्रयोजन होईल ते गांवचे पाटलास द्यावे अथवा सरकारचा सिपाई किंवा मामलेदार असेल त्याच्यापुढे ठेवावे याप्राो चालले असे वतनवतनदार गोत घरणे याचा मुकादम कोण्हीं नाहीं सर्व वडिलपण सरकाराचें याजप्राो चालले आहे यामागे या वतनाचा वडिलधारा कोण्हाकडेस आहे तो हाजीर नाहीं ऐसेंही ठावकें नाहीं बहुकाल वतन दार असोंन प्रांत मजकुरींहून फार रोज गुदरले इकडील वलवटा मोडला याजमुले आडलत. नाहीं येसे असील तरी न कले. सांप्रते चाल चालली आहे ती विदित केली यावरून कृपालु होऊन लिहिले वतन आमंच्या दुमाले केल्यास भोगवटा करावयास उमेदवार आहों म्हणोन त्यावरून मनास आणितां प्रांतात ज्ञातीज्ञातीस वडिलधारा मानपान चालत आहे कराडी जातीस चालत नाहीं सरकार अमलात दाखला वडील-पणाचा मानपान आहे व येते विदित केले यात तोच अर्थ आहे यांत शौश-यात्मक नाहीं निवारास वतन दुमालेयास लागले याविना रूढीस येत नाहीं हे जाणोन साल मजकुरांपासोन तुमचे दुमाला करून भोगवटे यास वतनपत्र सादर केले केलें असे तर तुमचे ज्ञातीन शुभाशुभ कार्ये प्रयोजन होईल तेथे माजी खाजप्राो गघ विडे लग्नाचा सेला व पाटाचा घेत जांवा ज्यास सेला द्यावयाची अवकता नाहीं त्याण्हे सेलेयाचे ऐवजी नारल दिल्हा तरी बहुत मान करून सेला समजोन घ्यावा ज्या कलास अवकात आहे त्याजला त्याचें जीवन पाहून सेला घेत जावा न्याहातीत न्याये मनसुबी जाहाली तरी तुम्हीं करीत जावें सरकारात विदित करावें सरकारांतून पारिपात्य अतवा खंड गुन्हे-गारी होणे ती होत जाईल याप्राो वतनाचा भोगवटा साल मजकुरापासोंन तुम्ही वडिलांचे पुत्रपौत्रीं वौशपरपरेने अवलाद अफलाद करीत जाऊंन मानपान गघ विडा टिला सेला परडी ज्या कार्यास जो मान सुभाचा तो सुभाकार्यास घेत जावा यावरून समघे तुम्हाजवलोन हरखी नजर रुपये १७५ एकूण पावणे दोनसे घेऊन लिहिले प्राो वतन दिल्हें असे भोगवटा दर दरसाल करीत जाणे वतनदार समघे म्हैस एक व घर व लगटका एक सदरहु प्राो साल दरसाल पडत जाईल म(ह)णोन वतनपत्र

सदरहु वतनीपत्र जदीद सरकार तर्फेने दिल्हे तेव्हां अदिकारी वतनंदार यांचा आधिकार कोठे राहिला त्यांचा उजूर रयेतीने कायेनिमत्य करावा व प्रजालोक रयेत येण्हे सेतभात करोन दिवाणाचा माहासूल देऊन वेठबेगार करोन गुजरानी भरावी हकीमास घर देणे व गांव खर्च व ताबाकुपटी द्यावी लग्न कार्यास लग्नटका देऊन कार्ये करावें हेच रयेतीस भारी गोस्ट समजत असतां हाली लग्नटका सरकारात देऊन चिटी काढावी या खेरीज नवी कानु मुकादमास सेला द्यावा हे रयेतीस सतोश किंवा न कळे हा अर्थ हाकीम धनी येही विचारात आणावी मालयेत पाहातां रुा पावणे दोनसे येका याचका अथवा कलावतास येके घडीने बक्षीस देतांत.

———

ले. १३ } { शके १६९१ इ. स. १७६१–६२

हकीकत प्रांत चेऊळ सरकार खुज़ीस्तेबुनयाद तळकोंकण नबामन-मुळकी प्रा आभेपुरी

सन सबैन मयां व अलफ ते सालीं आगर चेऊल येथील सचणीस जजिरे कुलाबा कारकीर्द रा राघोजी आंगरे रा मल्हार विश्वनाथ भावजी जनार्दन सचणीस आले तेही आपले आवडीप्रमाणे वाडियांची हद्द सरकारचे रकमाळे यास लिहिली वाडी

हा अदिकारी यांचें उतरेस बारकुम वाडीचें खत रामाजी गोत्र प्रभु १

सदरहु वाडीचे उतरेस सिदी अंबर १

त्या वाडीचे उतरेस वाडी हा जनार्दन दादजी हाली फर्जदान भावजी जनार्दन

येणेप्रो कदीम पाहाणीस असतां सालमबकुरी समग्रवाडी भावजी येहीं आपले नांवे लेहून कौल घेतला कलम १ पा आभेपुरी आगर चेऊल १

वाडी अघोरी हा साबाजी रगाजी सबनीस हाली फर्जदान पुतळाजी व दादाजी वाडी मामुरी करून विहीर गजीव बाधिली

१ खासगत वाडी अघोरी

१ वाडी हा बाळाजी बाब

१ वाडी हा सिवजी दुभासी व गणेश दुभासी

३

वाडी नजीक श्रीमळेश्वर श्री त्रिविक्रम नारायेणाचे पछेमेस निसब(त) महादजी बाळाजी देसाई व कुलकर्णी

खासगत उतर भाग १   हा हिराजी रगाजी प्रभु सुतार व सिरंग सुदामा सिरंग सुदामाचा वालीस हाली गोविंद त्रिंबक मुबेस आहे   १

यास देक्षेण हद मोगल हाली कोलटकर रा कृस्णाजी नाईक

वाडी तांम भाट बाबत हवसी हालीं निसबत माहादजी बालाजी देसाई

गोविंद केशव व बालाजी केशव येही खराबा वाडी मामूर केली त्यामधे वाडकर रा।

१ सिवभट उपाधे

१ भिकमभट भाटे उा

१ अंतभट उा

१ दादभट उा

४

---

ले. १४

दतपुत्र ब्राह्मण समुदायामधे जाहाले त्याचा बयाज तपसिलवार

मामले चेऊळ

गोविंद कृष्ण देशमुख यांते कृष्णाजी महादेव दत्त त्याचे पुत्र गोविंद कृष्ण त्याचे दत्त प्रथम पुत्र घेतला तो मृत्य पावला त्याजमागोन खंडोपंत दिघे यांपासोन अबाजीपंत घेतला १

बाबू जोसी बेल्हात्रीकर येही माहादेव बाबत...दत्त घेतला   १

---

ले. १५

श्रीगणेशायनमां

हकीकती प्रांत तलकोंकण व वरघाट सुबे खुजीस्ते बुनयाद नि(जा)मनमुलकी सनहाये व शकहाये श्रावण पुणिमेस नारळ चेऊळचा रेवदडेयास आत होता फिरंगी याणे मोगलाचा भालदार मारिला त्या दिवसापासोन चेऊळचा नारळ पीर आदम नजिक खाडीमधे टाकीत आसत राजकोट मोगलाजवळून रा सेकोजी आगरे सरखेल याही घेतला राजकोटचा नारळ सरखेल याजकडून सरदार रघुजी सबनीस व पंचवीस बरकंमदाज सिपाई येऊन जमीदार सेटे माहाजान चोधरी रयेत मिलोन ते समई फिरंगी याजकडे पेगाम पाठवावा त्याचे बराबर दाहा आसामी सरदार भडारी व रामा लखम पाटेल कोली रेवदडा आसे येत आसत हजसी पाटेल कोली कसबे दादर यास नारल

पाच व पानाच्या पस्त्या पाच कोली लोकास देत असत नारलासमई रामा लखम पाटेल येणे कथला केला की हबसी पाटेल यास मान देऊ नये आम्ही पाटेल नारलाचा मान आम्ही घेत आलो रघुजी सबणीस याही दोवासी दिल्ही नाही रामा लखम पाटेल रेवदंडकर हुजूर जजिरे कुलाबेयास जाऊन सरखेल यास विदित केले त्यावर सरखेलचा हुकूम जाहाला की जमीदार सेटे माहाजन चोधरी यास पुरसीस केली नारलाचा मान कोनास मिलव असतो ते समई जमीदाराची शाईदी गुदरली की हबसी पा॰ कोली चेऊलचा कदीम त्यास देतो कोली लोकात हरयेक जाती समध्ये कथला पडला···असतां चेऊलचा पा॰ प्रातातील आपली जात मेलऊन खटले तोडतात असी चाल पूरवापार आहे जातीत···मानपान हबसी पा॰ को॰ दादर यास मिलतो...रामा (ल)खम पा॰ कोली रेवदडकर खोटा पडला···फिरगी याचे सरदार याजबराबर येत असतो रामा मजकूर खोटा पडला

---

ले. १६ } { शके १६२३, पौष शु॥ १
इ. स. १७०१, डिसेम्बर १९

अजदीवान व फौजदार बंदर मुर्तजाबाद उर्फ चेऊल (फार्शी
खैरख्वा जोसी व उपाध्ये कसबे चेऊल विदानद के शिका.)

सु॥ इसने मयां व अलफ साल मजकुरी चैत्र सुध्द प्रतिपेदेस नवें सालचें पंचांग तुम्ही जोसी उपाध्ये येहीं आधी जमीदारांकडे सांगितलें मागोन माहाली अमलदारांस सागितले म्हणून महमदखान हवालदार येंही जोसी उपाध्ये यापासोन मसाला घेतला बादज जमीदार व जोसी उपाध्ये हुजूर येऊन मलाजमतेस अर्ज केला जे पेसजीपासून कारकीर्द दरकारकीर्द बाछाई अमलांत फौजदार चेवलात येत होते बादज मराठेयाचा अमल जाहाला तेव्हाही सुभेदार मामलेदार येत होते त्यास आधीं जमीदारांकडे पंचांग सांगावे बादज सुभे मामलेयांस सांगावें ऐसा दस्तुरात भोगवटा आजपरीयेत चालत आला असे त्यावरोन खातरेस आणिता दामोधर पिटकर व सेटे चौधरी येंही व सरकारचे नवीसिंदे मुछदी येंही शाहदी दिल्ही त्यास बाछाई जमीदार असत जे मोजीब पेसजींपासून चालत असे त्या मोजीब देसाई व अदिकारी व देशपांडे याजकडे पंचांग सागावयाचा रवाद आहे त्यामोजीब सांगत जाणे तुमचा मसाला दूर करून अमलदारास ताकीद फर्माविली असे जाणिजे रा॥ छ २७ रजब

फा.
मोर्तब

---

ले. १७ } हुं { शके १६२३, पौष वद्य १३
इ. स. १७०२ जानेवारी १५

फार्शी
शिक्का

अजदीवाण सरकार किले राजकोट मामले मुर्तजाबाद उर्फ चेऊल रयां रयांन मांमले मजकूर सु॥ इसने मियां व अलफ दरविला आपाजी माहादाजी अदिकारी मामले मजकूर हुजूर येऊन बंदगीस इलतिमास केला ऐसा जे आम्हा जमीदाराचे हक सरकारी जमा आहेत त्यासिवाई देहाये प्रात मजकूर व रयां कसबा आगर रयेत नि॥ आपला कानुकायदा बितपा॥

दत पालक बेटा घेईल त्यापासून सेला कलम १
मोहतर्फा बाजेत्री यां पासून महसूल कलम १
डाकी स्थल काचलक्रिया व कुभार क्रिया यांजकगे हक कलम १
प्राइश्चित घेईल त्यापासून सेला कलम १
जोसी उपाधे ब्राह्मण यावी गोलक याजकडे हक कलम १
मोहतर्फा मां॥ कसबा यांपासून सण दिपवाली व सिमगा व पाडवा जीव प्रो कायदा कलम १

येणे मोजीब सुदामत पेस्तरपासोन आपला भोगोटा चालत आहे त्यास ते मोजीब सरकारतर्फेन सनद सादर होये तो हुकूम फर्मावेला पाहिजे त्याजवरून प्रां मजकूरचे वतनदार व रयान यांनजीक खातीरे आणोन सुदामत भोगोटा चालत आहे हालीं तेच मोजब मां॥रनिलेचा हक बाजीमा देत जाणे रा॥ छ २७ साबान (फा. मोर्तब)

---

ले. १८ } { शके १६२३ माघ शु. ७
इ. स. १७०२ जानेवारी २४

राजेश्री माहादाजी दादाजी देसाई देसकुलकर्णी चेऊल गा॥.

दं अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्ये स्नो॥ सुभानजी मोहिते हवालदार व कारकून जजिरे पदमदुर्ग जोहार व आश्रीवाद सु॥ इसने मया व अलफ उपर तुम्ही विनंतीपत्र पाठविले ते पावले साल मजकुरी बाम्हणगाव तर्फ सागरगडकरी यानी जाळून तलख केले येसीयासि आम्ही व राजश्री मल्हार नारायण यानी रयेतेस धीर भरवसा देऊन कीर्दीस लाविली आहे त्यासी मोगलाचा कौल दिल्हा आहे त्यामोजीब साहेबी जजिराचा कौल दिले पाहिजे म्हणोन तपसिले लिहिले तरी तुम्ही मोगलाचे तर्फेने कौल पेस्तर सालीचे

दिल्हे आश त्यास दिवाणाचे दस्तकानसी जमेचा आकार पाठऊन देणे म्हणजे जजिराहूनही रयेतीस दिल्हे जातील तरी अवश्येमेव दिवाणाचे दस्त कानसी आकार पाठऊन देणे मौजे खानूचा कौल सवा खडीप्रमाणे कौल मोगलाचा घेतला आहे त्यामोजीब जजिराचा कौल दिल्हा पाहिजे म्हणोन लिा तरी सारेच दस्त तुम्हाकडून आले म्हणजे सहजेच तुमचेही गावास कौल दिल्हा जाईल व सालमजकूर बाम्हणतर्फेने पाहाणी जाली त्याचा आकार दिवाणाचे दस्तका·····सत्वर पाठऊन देणे···( नि. अ. ) छ ६ रमजान हे··· मोर तबसु द

( सुभानजी मोहिते याचा अस्पष्ट शिक्का.* )

---

ले. १९ } श्री { शक १६२५ फाल्गुन व. १२ इ. स. १७०४ मार्च २१

राजश्री आपाजी महादाजी अदीकारी
मामले चेऊल गोसावी यासी

स्नेहांकित कानोजी आगरे नामजाद सरसुभा आरमार सुा आर्बा मया अलफ येथील क्षेम जाणोन स्वकीये कुशल लेखन करणे यानतर पत्र पाठविले पावले लिहिला अभिप्राये सविस्तरे कलो आला यैसियास तुम्ही लिहिले की भेट घ्यावी आपले वर्तमान विदित करावे यैसे मानस आहे म्हणोन लिहिले तरी बहुत बरे तुम्ही भेटीस येणे भेटी जाहालियावरी आपले वर्तमाण (सविस्त)र विदित करणे त्यावरून तुमचा सरंजाम काये......केला जाईल रा छ २५ जिलकाद ( नि. अ. ) मोर्तब सुद मोरतब. सुद

---

ले. २० } श्री { शके १६२६ वैशाख वद्य ५ इ. स. १७०४ एप्रिल २८

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ३० तारणनाम संवत्सरे वैशाख बहुल पंचेमी[1] भृगुवासरे क्षत्रिये कुलावतंस श्री राजा शिव छत्रपति यांणी रायाजी सदक प्रभु पारपत्यागार पा सांकसें यासि आज्ञा केली ऐसीजे जंजिरे पद्मदुर्गाच्या तनखियास

श्री शि वनस्पति हर्षनिदान मो रेश्वर सुत नील कंठ प्रधान

श्री आई आ दि पुरुष श्रीराजा शिवस्वामीकृपानिधी तस्य परशराम त्र्य बक प्रतिनिधि

सालगुदस्ता स्वामीनी राजश्री नहिरो पंडित प्रधान याकडून देविले त्यांणी

---

१ खरे जंत्रीत पंचमीचा क्षय दिला आहे.

आउर वलित पैकीं २ दोन गांव नेमून दिल्हे आहेत ते स्वामीनी करार केले असत तरी तुम्हीं हे जाणून पंडित मशारनिलेनीं जे गांव नेमून दिल्हे आहेत ते जंजिर मजकूरच्या कारकुनाचे स्वाधीन करणें ते वसूल घेतील तुम्ही कांहीं वसूल न खाणें खलेल केलिया ताकीद होईल हे जाणून लिहिले प्रो वर्तोन गावांची कीर्दी मामुरी होये तीं करणें ( नि.अ. ) निदेश समक्ष

मर्या दशबुर्शी मोर्तब
देयंविरा
जते

( कागदामागें* ) रुजु सुरु निवीस सुरुसुद बार

———

ले. २१ हुं शके १६२६ कार्तिक व॥ १४
इ. स. १७०४ नोव्हेंबर १५

बजानेब अमिलानी व कारकुनानी हाल व इस्तकबील व देशमुखानी व देशपांडे यानी बंदर मामले मोर्तजाबाज उर्फ चेऊल बिदान· (फार्शी दके सुा खमस मियां व अलफ दरीविला आपाजी माहादाजी शिक्का) अदिकारी मामले मजकूर हुजूर येऊन बंदगी हजरती इलातिमास केला येसाजे पेसर्जी बाछाई अमल होता ते मर्तबां जमीनदारास पचोत्रा पावत होता दरम्याने सिवाजी राजे यांचें काबिजात जाहालीपासून पावत नाहीं हाली बाछाई अमलाची पैवस्ती जालिया बाजद इसावतीचा हक हालफिल चालों द्यावा म्हणोन हुकूम फर्माविला असे त्यास कमीनाचे इसावती गांव मौजे ढवर तो खडार्ले मौजे माहान तो पाल मौजे कुदे तो उमटे
१ १ १

सदरहु तीनी गांव कमदस्त जाणून कमीनाची बेहबुधी चालणार नाही व आपले बिरादर वतनभाऊ यांसही जदीद गांव सरकार तर्फेनें इनायेत केले आहेत त्या मोजीब कसबे श्रीगांवचा इसावतीचा हुकूम होऊन सनद मऱ्हामत केलेयाने बंदेयाची सर्फराजी होऊन येईल व हेविसी रफातपन्हा सिदी खान दंडा राजपुरी यांचें सिफारसखत रुजु केले त्यास खान मशारनिले यांचे बदल खातीर व जमेदारावर नदर देऊन पेसजीचे गाव तीन व हाली कसबे सिरगाव मिलोन च्यार गांव इसावत मुकरर करार केले असेत सदरहु इसावत दस्तुर मोजीब पालणूक करणे ताजे संनदेचा साल दरसाल उजूर न करणे नकल घेऊन आसल भोगोटियास देणे···छ २७ रजब (फा. मोर्तब )

———

ले. २२ } श्री { शके १६२५-६ इ. स. १७०४

साहेबाचे सेवेसी आज्ञाधारक भावजी आपाजी अदीकारी मामले चेऊल साहेबीं आज्ञा केली कीं तुमचे वतनाचा भोगवटा आवपावेतों न चालाव याचा अर्थ काये त्यास मोगलाई अमल कमकुवत जाहाला चेऊल प्रांती धामधूम होऊन बहुतांची साईबी जाली खांदेरकरांचा अमल या निराला पदमदुर्गाकडील व कुलाबा व राजकोट तर्फा येसें त्रिराज्य जाहालें येकेकडे रुजू होऊन दुसरे तर्फेस रुजू न होतां जीव वांचत नाहीं ते प्रसगीं कितेकांचे नाश जाहालें तें भये जाणून रेवदंडास सुखवस्तीकारणे राहिलों त्या उपर (मो. जा.) माहाराज कैलासवासी येहीं वतनदारांस पत्र सादर केलें कीं हुजूर येणे त्या उपर भेटावयास जावें हा निश्चये केलियाउपर त्रिंबक गणेश सेणवी कुलाब तर्फेन रेवदंडेयास आले होते त्यांचे भेटीस देशक जाऊन भेट घेतली या उपर माहादाजी देश-कुलकर्णी येण्हे गोविंदराऊ देशाई यांस बोलिला कीं कुलाबेयास जाल तेव्हा तेथे हक लाजीमा लेहून मागिवील त्या उपर आपाजी अदीकारी आपला हक लाजीमा लेहून देईल तुम्ही आम्ही काये लेहून द्यावें असा विचार करून माहादाजी कुलकर्णी याण्हे राजकोटास दिवाणास जाहीर केलें कीं आपाजी अदिकारी त्रिंबक गणेश यांचे मतें कुलाबतर्फेस रुजू जाहाले असत आणखी कितेक गैरवाका समजाविलीयावर अदिकारी व देशाई यांस आणून नालीसी बाधून उडवावयास आज्ञा केली यावर भया अनंदीराम व···कसी याण्हे अर्जे केला की जे डोलेयाने पाछाईस पाहावे अण त्यांचे नावावरून पैलपार उतरावे त्यांचे नाव तुम्ही बुडविता तेव्हा दूरदेशा विचार पाहाणे··येसी कितेक वजा रदबदल केलियावर नवमहिने पावेतो बेडी घालोन अटक केली होती असा कितेक अर्थ आपणावर गुजरला तो सेवेसी लि॥ पुरवत नाही साहेब जाणते असा याउपर साहेब कृपालु होऊन आमचे हालावर नजर देऊन लक्षादि जनाचा प्रतिपाल करीत असा व बाजे वतनदारांचे उतम मधम चालवित असा त्याप्रमाणे आमची सर्फराजी करून चरणरजाचा प्रतिपाल केलेयाने हे लोकीं व परलोकीं पुण्ये आणि पराक्रम जोडून कीर्ती होऊन येईल वरकड आपला द्रुढनिस्चये असे कीं साहेबांचे हातोन आपले वतनांचे सार्थक होऊन येईल मोडले वतनदाराची स्थापना बहुतांची साहेबीं केली आहे तैसी सेवकाची स्थापना करणार साहेब धनी आहेत हे केलियाने चरणरजास खरीदी करून अजात केलें ऐसें होऊन वाराणसी यात्रा होईल हे विज्ञापी.

सन खमस [ मया व अलफ ]

फार्शी शिक्का

———

ले. २३ } हु { शके १६२९ आश्विन व. १४
इ. स. १७०७ ऑक्टोबर १३

······(आ) पाजी माहादाजी अदीकारी मामले चेऊल बीदानद (सुहुर)सन समान मियां व अलफ येसजी घोलाप नोकर सरकार किले राज को (ट)···न खारआदी याचे पोटीं पुत्र संतान नाही वौशास बागा असावी म्हणौन जावजी बोरगा नौकर सरकार याचा बेटा बनाम सुभाना (द)त घेणार म्हणौन हुजरून हुकूम घेतला आहे त्यास तुम्ही दस्तु(र) मोजीब दताचा आपला मान सेला घेऊन त्याचे जमातीचे देसक···लदार याचे शाहिदीने व आपले मह्जबमोजीब बाहाह्मणाचे हातो (न द)त घेईल त्यास घेऊ देणे जाणिजे रा छ २७ माहे रजेब (फा. मोर्तब)

---

ले. २४ } हु { शके १६२९ फाल्गुन वद्य ४
इ. स, १७०८ फेब्रु. २८

फार्शी
शिक्का

मा अनाम माणीक नाईक वलद हुल नाईक व बाबा घरत वलद करे घरत पाटेल देशई मामलें चेऊल सुा समान मयां व अलफ सरकारी किला सागरगड कुलाबकर गनिमाने घेतला त्यास मजकूराचा महसूल कुलाबकराचा वसूल करोन सरकारतर्फेचा वसूल केलात नाही अजी सबब तुम्हा हरदूजणास हुजूर आणून कित्येत दिवस कैदीत ठेविलें आण येक हजार रुपयांचा तकादा केला बादज अजम सिदी खान दंडाराजपुरी यांचा लिखाबद्दल खातीर माफ केलें रुपये ५४० बाकी करार रुपयें

| | |
|---|---|
| मोजे सोगाव तो झिराड सा | तो परहूर (मो. जा.) रुपये |
| १५० बा माणीक नाईक | १०० मौजे बहिरोले बा माणीक नाईक |
| १५० बा घरत | ६० मौजे बेलोली बा माणीक नाईक व बाबा घरत. |
| ३०० | १६० |

ये॥ च्यारसे साठ रुपये मा दामोदर भट पिटकर रसद जमा पोता असत रा छ १६ माहे जिल्हेज (फा. मोर्तब)

---

ले. २५ { शके १६३७ वैशाख व. ११
इ. स. १७१५ मे १८ }

० श्री

राजाराम चर
नी सादर तुकोजी
सुत कानोजी आ
गर नीरंतर[1]

आज्ञापत्र समस्त राजकार्यधुरंधर विस्वासनिधी राजमान्य राजश्री कान्होजी आंगरे सरखेल ता। वाडवल प्रा। चेहूल सु॥ खमस अशर मया व अलफ भिवजी राणा याचा भाऊ गोदजी राणा हा फिरगाण प्राते बहुत दिवस होता म्हणोन तुम्ही त्यास पक्तीस घेतला नाहीं येशास गोदजी माराने ब्राह्मणास अन्य व देवास दीप देहू केला आहे तेणे प्रा। देहून जातीत घेणे ( नि. अ. ) छ २५ जमादिलौवल ( मोर्तब सुद )

---

ले. २६ नकल } श्री { शके १६४८ भाद्रपद शु॥ १३
इ. स. १७१८ ऑगष्ट २७

कान्होजी आगरे

स्वहस्ती नृप शालिवाहन शेके १६४० विलंब सवत्सरे भाद्रपद शुध १३ बुधे तदिनी चंपावतीस समस्त जोसी आगरकर व बेल्हावकर

| आगरकर जोसी | बेल्हावकर |
|---|---|
| १ रघु जोसी पुरुशोतम जोसी | १ कृस्ण जोसी नारायेण जोसी |
| १ दाद जोसी केंशव जोसी | १ गंगाधर जोसी श्रीपत जोसी |
| १ विठल जोसी बाल जोसी | २ |
| ३ | |

यांस माहाराजा (भो. जा.) सरखेल कुलाबियाचे मुकामीं असतां आम्हां समस्त जोसीयांस पाचारून आज्ञा केली असी जे तुम्हास मामले चउलात वृत्ती काये आहे ती लेहोन देणे म्हणोन आज्ञा केली त्यावरून आमचे वृत्तीचा उपभोगप्रमाणे लेहोन दिधला तपसील नगर चेऊल पाखाडी १२ तिगाव पाखाडी ३ येकूण १५ देखील पालव व मला व बागमला व कसबा व तपे उमटे व महान व बाम्हण तप्याचे नदीचे दक्षेणेकडील गांव इतकी आमची जोतिश वृत्ती आहे त्या वृत्तीमध्ये आमचा उपभोग

---

१ कान्होजीच्या अनेक शिक्क्यांतील हा एक.

[ समासांत* ] सदरहू असल पत्र हस्ताक्षेर बालु जोसी बेल्हावकर

सर्वत्र शुभा शुभा अनुस्ठानी

१ गणेशपूजन

१ पंचाग सर्वत्र वं सर्व कार्यो अनुस्ठानी घटिंका व अंतःपर सेला १

१ सर्वत्र लग्नमुहूर्त घटित जन्मकाळ सांगणे व लिहिणे जोसीयाचे कलम १

१ सर्वत्र पांचा ब्राम्हणाचे अनुस्ठान जप होमादिक होईल तेथे जोसी यांचे प्रयोजन १

१ क्षौर प्रायेश्चिती तिलपात्र आमचे

१ वाणियांकडील अघरणी व लग्नपत्रिका जो जोसी हजीर असेल त्याची दोघे जोसी हजीर असतां आगरकरांचे घरांस मान १

किता कलमे.

१ संवसर प्रतिपदेस आमचे बराबर समस्त ब्राह्मणांशी पंचागाची दिंडी करावी

१ जेथे आगरकर व बेल्हावकर असतां प्रथम संवत्सरफल आगरकरांहीं सांगावें

१ चहुवरतें वाण व दान होईल तथें पाचवें आमचें.

१ श्रावण पौर्णिमेचा नारलाचा मान आगरकर जोसी यांमध्यें येके घरास मान आहेत नसले तर जो जोसी असेल तो टाकील

१ कोली व भोई यांचे येथें जे आंचणी व गणेशपूजन होईल ते आरधी आमची १

१ आचणीचा तपसील

१ अदकारी

१ पाताणे प्रभु

२ गौली

१ सास्टीकर जात सुतार नामाजी यांचे येथे आचरणीसहित गणेश पूजन आमचे

४

ब्राह्मण

१ देशस्त माध्यादीन कांवणव (काण्व) यांचे येथे सर्वा अनुस्टानी गणेशपूजन आंचणी सहित आमचें

१ सर्वत्र कोळी व भोई यांकडे लग्नीं व मुहूर्तीचे उत्पन्न हात सेला सहित व आंचणी आरधे आमचे

१ स्वारबंदीमधे मराठे चाकर मानेकडे जे आचणी व गणेशपूजन होईल ती आचणी आरधी आमची

लग्न मेढ मुहूर्त व वोट भरणे व पाट होईल तेथील सर्व उत्पन्न अरधे आमचे अरधे उपाध्याचे फलप्रदानी वाण परडीचें कितेका स्थली आहे याप्रमाणे आगर कसबे यांत उपभोग ता उमटे व माहान येथे उपभोग सर्वत्र शुभाशुभा अनुष्ठानीचें आचणीवर गणेशपूजन होईल ती आरधी आचणीसहित गणेशपूजन आमचे व लग्नी मेढ मूर्त वोट भरणे व पाट येथील उत्पन्न

सर्व आचणीसहित [ समासांत* ] इतकी आम्हा उभयेता जोसियांची मामले चेवलात वृत्ती आहे हे त्यास अनेथा झाले तर अन्याई असो.

आरधे आमचे पंचाग व घटिका सर्वत्र आमची ताा बाम्हणगाऊ येथील दक्षणेचे गावी खेरीज गाव ३

देवघर १

मल्याण १

वरडे १

यां व्येत्रिक उपभोग उमटे याप्रो या वृत्तीमधे जोसी आम्ही आगरकर व बेल्हावकर उपाध्ये चेऊलकर जेथे चेऊलकर उपाध्ये नाहीं श्वतत्र आमची वृत्ती उभयेतां आगरकर व बेल्हावकर यांची तिचा तपसील

ताा माडले गांव देखील कोरला ३३ या तप्यामध्ये श्वतंत्र आम्ही जोसी व उपाध्ये व धर्माधिकारी व पुराणिक व पुरोहित माा नागाव व आंगासी व बाम्हण तप्याचे नदीचे उत्तरेचे गांव येथे यज्ञोपवीत जो धरितो त्याचे येथे जोसीपण आगरकर जोसी यांचे येके घराव वृत्ती उपाध्ये थलकर क्रमवंत ताा सिरगांव येथील जोसी गोलक त्याचे दतगांव ७ सात आहेत तेथील जोतिसी व उपाध्येपण व द ण व पुराण व पोरोहित्य आमचे स्वतत्र बेल्हावकर जोसी···श्री कनकेश्वरी कार्तिकीस दीपाचे गणेशपूजन···उभयेतां आगरकर बेल्हावकर यांचे असे

देउले त्यांचा तपसील

आंगरकर २ गणेश १ कुडेश्वर १

बेल्ही १ सोमेश्वर १

[ समासांत* ] पाताणे प्रभु यामध्ये पुरोहित पणाची काही घरे आगरकर जोसी यांस आहेत १ देशमुखांचे पेसवे यांकडील पौरोहित बेल्हावकर जोसी यांचे

---

ले. २७ नकल } श्री { शके १६४२ चैत्र शुद्ध १२ इ. स. १७२० एप्रिल ९

आज्ञापत्र समस्त राजकार्य धुरधर विश्वासनिधि राजश्री कान्होजी आंगरे सरखेल ताा माहाजन वर्तमान आगर चेऊल सुाा आसरीन मयां व अलफ पुतलाजी माहादेऊ कुलकर्णी माहाल आगर माा याचा भाऊ रामाजी माहादेऊ याणे हुजूर येऊन विदित केलें की आपला भाऊ पुतलाजी माहादेऊ कुलकर्ण चालवीत आला तो मृत्ये पावला या उपर आपणही चालवीत असतां हालीं दुसरा कुलकर्णी नूतन भावजी सुंदर यांसी साबाजी रगाजी दिमत

चेऊळकर याहीं ठेविलें आहे तर आपणाजवळी पूर्वील पत्र राजश्री आबाजी माहादेव सरसुभेदार यांचे आहे तें साहेबीं मनास आणून आपले कुलकर्ण आपणास चालवावयास आज्ञा केली पाहिजे त्यावरून मशारनुलेचें पत्र मनास आणितां पुतलाजी माहादेव या पासोन सिरणी लाहारी ५०० पांचसे घेऊन कुलकर्ण करार केलें आहे ऐसें असतां नवदिगर दुसरा कुलकर्णी ठेवावयासी प्रयोजन काये आहे हाली रामाजी माहादेऊ याचें कुलकर्ण याचे हवाले करविलें असे आगरमारी कुलकर्णपण चालवीत जाईल याउपर कोण्ही कथला करील अगर दुसरा चालवील त्याचा मुलाहिजा होणार नाहीं शाहासन केलें जाईल ऐसें जाणून वर्तणुक करणे

———

ले. २८ नकल } श्री { शके १६४४ भाद्रपद शुा ९ इ. स. १७२२ सप्टेंबर ८

अभयेपत्र समस्त राजकार्यधुरंधर विस्वासनिधी राजमान्ये राजश्री कान्होजी आगरे सरखेल ताा माहाजन वर्तक व रयान. बागायेत चेऊल सुहुर सन सलास असरीन मया व अलफ कारणे दिल्हे अभयेपत्र यैसे जे माहाल आगर व कसब बागाईत मरूतां ईा।। सन समान ताा सन इसने पाच सालां होतां सालगुदस्तां इस्तावा पुरला साल मजकुरी पाहाणी व्हावी याबदल हुजरून राघो बलाल व सुदर जनार्दन पाठऊन पाहाणी करावयाची आज्ञा केली यैसीयास पाहणी केलियान रयेतीस उमेदवारी होत नाही म्हणोन मार-निले याहीं हुजूर लेहून पाठविले त्याजवरून मामुरीवर नजर देऊन बरहुकुम गुदस्तां जमाबंदीप्रमाणें मरूता पाच साले इस्तकबिल सालमजकूर ताा सन सबा करार केले असे चोरवारीचे व राहदारीचे आगर जे आहेत तेथील नारल लाकड वाचत नाही ते आगरात भंडारमाड घ्यावे म्हणोन आर्ज तुम्हीं रयेतीने केला त्याजवरून भडारमाड घ्यावयाची आज्ञा केली असे--ज्याजती शा-- खेरीज रयेतेने तोडिले म्हणोन दर माडास रुा।८= दोन आणे चवलप्रमाणे सालमजकुरी घेतला त्याविसी तुम्हीं रयेत हुजूर येऊन अर्ज केला की माहाल मजकूर आगर जबून रयेत नातवान कृपाळू होऊन दर माडास चवल घ्यावयाचा सिरिस्ता आहे तो माफ करावा म्हणोन आर्ज केला त्यावरून मामुरीवर नजर देऊन सदरहु चवल दर माडास माफ केला असे शापाचा दरमाडास ४ च्यार प्रमाणे सिरिस्ता बाजे गावी आसे यैसीयास माहाल मजकूरचा आगर वैरान खराब माड झिटे याजकरिता बाजे गावीचे सिरिस्ते प्रमाणे शाप दिल्हे जात नाही म्हणोन अर्ज केला त्याजवरून मामुरीवर नजर देऊन सालगुदस्ता-प्रमाणे शाप करार केले असती पाच साले इस्तावा पुरे तोवर बागायेतामधे

जो वरकस होईल ते खेरीज ऊस ताग माफ असे पाच साले इस्तावा करार केला असे उमेदवारी धरून सुखरूप कस्ट मसागत करणे कोण्हे बाबे शक अदेसा न धरणे अभय असे रा छ ७ माहे जिल्हेज

---

ले. २९ नकल | हु | शके १६४६, आषाढ शु॥ ३ इ. स. १७२४ जून १२

अर्जदास्त अर्ज दर बंदगी——बंदे कमीन कमतरीन बदा [स]याजी विसाजी हवालदार व कारकून मामले मुर्तजाबाद उर्फ चेऊल बंदगीस अर्ज ता। छ १ माहे शौवाल सु॥ खमस आशरीन मिया व अलफ···बंदे कमी· नाची व मामले मजकूरची अर्जदास्त···खैरियेत असे

बा। साहेब मेहरबान सलामत तावजी दामाजी देशकुलकर्णी मामले मजकूर यास सन सलासामधे हुजुरून मामले मा।रीची देशकुलकर्णपनाची खिजमत फर्माऊन माहाली रा। केले अैसेयास तावजी मजकुराने मामले मज- कुरी लिहिणार देऊन जमेचे लिहिणे आकारास आणावे त्यास तावजी मजकुराने लिहिणार द्यावयास हैगई केली या सबब येक दोन वेळा निकडीने लिहिणाराबाबे ताकीद केली आम लिहिणार दिल्हा नाही यावरी······मजकुराचा मजमदार माहादाजी रघुनाथ बहुत······म्हणोन माहालीचे लिहिणे याचा मामीला व कारभार कुल······ला होता सन सलास गुदरोन सन आर्बा सात महिने गुद· रून गेले तरी तावजी मजकुराने लिहिणार दिल्हा नाहीं व मामले मजकुरी मनजबदार नाही हे हकीकत पेशजी बंदगीस लिहिली होती त्यावरून साबाजी तुकाजी यास मजमूची खिजमत फर्माऊन माहाली रा। केले त्यावरून लिहिणे— याचे खबरदारी करून माहालीचे लिहिणे दफतरदार याण्हे आकारास आणिले जमेचे लिहिणे मजमदाराने करवावे त्यास तावजीचे दिमतीने लिहिणार नाहीं याकरितां तावजीस माहाली आणून बहुत निकड करून बसविला आण माहा- लीचे कागद हजूर रवाना करावयास तयार जाले याबद्दल तावजीस निकड [केली] ते वख्ती बाळाजी देशकुलकर्णी चेऊलास होता याबद्दल तावजी माहाली- हून रजा घेऊन बाळाजी···सआला होता व साबाजी तुकाजी मजमदार माहाली ···तेही उदेरीस आले तेथे तावजीस आणून······फजित करावयाचा तो बहुत च केला तेव्हा कबूल केले की हाली आपण लिहिणार देतो यैसे कबूल केले त्यावर बंदे कमीन माहाली आला व तावजीही माहाली आला त्यास लिहिणार दिल्हा नाही दफतरदार हजूर जाऊन दोन महिने बैसला असे याबद्दल तावजीस बंदगीस पाठविला आहे या वजाची हकीकत असे हाली आर्बाहि

गुदरून गेले येक दोवा महिनेयामधे कागद हजूर रा। केले पाहिजेत आण कुळकर्णी याची हकीकत या वजाची असे मामले मजकुरी देशकुलकर्णी याचा सरंजाम होये असे करणार साहेब मावाप धनी असत वदगीस रोशन होये हे अर्जदास्त¹

[ कागदाचे टोकाशीं* ] अर्जदास्त

---

ले. ३० } श्री { शके १६४७ श्रावण वद्य २ इ. स. १७२५ ऑगस्ट १४

आज्ञापत्र समस्त राजकार्येधुरधर विश्वासनिधी राजमान्ये राजश्री कान्होजी आगरे सरखेल ता। धर्मा बिन भीक पाटल मौजे बापले ता। उमटे सुभा प्रात चेऊल सु॥ सीत अशरीन मयां व अलफ माहादा लखम पाटेल कुलबी मौजे मजकूर व तू मौजे मजकूरचे पाटेलकीचा कथला सागत हुजूर कुलाबेचे मुकामी येऊन वर्तमान विदित केले त्यावरून ता। मारचे सीव शाडे पाटेल व खोत मोख्तासर हुजूर आणून पूर्वापार मनास आनीता मौजे मजकूरचे वतन बेवारीस जाहाले आहे वतनदार ,पाटेल कोण्हीं नाही असे खरे जाहाले असीयास बेवारीस वतने असतील ती सरकारची हाकीमा ज्यास वतन करून देतील त्याचें वतन हे जाणून मौजे मजकूरची आबादानी व्हावी याकरिता तुजवरी कृपाळु होऊनं मौजे मजकूरचें पाटेलगीचें वतनं तुझे दुमाला करून सदरहु वतनाची हरकी रु॥ ५० पनास दुतर्फा करार करून सनद सादर केली असे तरी मौजे मजकूरीचे पाटे(ल)गीच्या वतनाचा उपभोग पेढी दरपेढी करून सुखरूप राहाणे हक रुसुम सिरिस्तेप्रमाणे घेत जाणे मौजे म(ज)कूरची पाटेलकी खेरीज सोनखार तुजला दी² दीधली असे गावीची आबादानी करून पेढी दर पेढी वतनाचा उपभोग करणेस

---

ले. ३१ } श्री संकर { शके १६४८ आषाढ शु॥ ९ इ. स. १७२६ जून २८

निश्चयेपत्रं शके १६४८ पराभो छवछरे माहे आखाड सुध नवमी भोमवासरे ते दिसी पत्रलेखनार्थ केला येसा जे समस्त प्रभु पाताणे यातीं चेऊ-

---

१ [ तुटक रेघ टाकलेली आहे तेथें मजकूर अस्पष्ट व नष्ट; कागद अगदी जीर्ण ]

२ येक दी अधीक पडली आहे.

ठकर तथा रेवदंडेकरीं पूर्वापासोनं आजरपयेंतु प्रशगानुंशार येकरूप होते आणि जे हरयेकं विचार अथवा महदकार्ये अथवा हरयेक विचार करणे तो येक येकाचे अनुमते व शास्त्राचे आधारे व बनामधेही रुंसवा न होये व प्रशंगा अनुशार न्यायेनिष्ठ येसे आजपरयेंत चालोन आले आता सांप्रत तारुण वये-करून कोण कोण्हास मानीत नाही आपआले जागे थोरप(णे) आणून वडिलाचाही कथला करितातं व न्यातीचा कथला अजपरयेंतु दिवानात गेला नाही व सर्व समदाव जाला म्हणजे वडील वडील आसतील त्याही हरयेक परसगाशारिखा निवाडा करावा अेस होत त्यास आतां वडील आहेत त्यांचेही काही चालों देत नाही मज्यालसीचाही उबार राहिला नाही तेथे दिवान दरबा( र )च्या गोष्टी तर यामागे थोर थोर हुद्दे मामले करीत होते तेंव्हां येसा विचार होत नवता येसे दर वर्तले आहेत यासाठी आपली नामांकित घराणी जे आहेत त्याहीं दीर्घ दृष्टीनें पाहोन येकविचाव करोन आपले संचतर पूर्वं स्मरोन हरयेक स्थली येकायेकाचा उबारे करून मानमतवे त्यास ते ते···ण येक प्रसगी पद[ री ] पडतील की आमचा काये अपराध तो सागणे हे तुम्ही दोन थड केले काये निमित तर त्याचा विचार तो उघडा दिसोन आला असे तो कोण कैसे

येकतर चोरलेकर प्रभु हे फिरगाण प्रांती आपगत आहेत वर्तत नाहिं त्याहीमध्ये त्यांचे सिरी दोस काये तो निस्चये जाला नाही येसे असतां चोर-लेकर चेऊलकरास सरण आले त्यामुले त्याचा अभिमान पडला त्या निमित्य लाहानथोर मिलोन आपल्यामध्ये वर्त-वीत गेले त्यास आज दाहाबारा वरसे जाली येसे असता सांप्रत मुंबईमधे त्याच्या कटकटी बहूत व वाढल्या आहेत दिवानामधे गेले असत त्याचा निर्वाव कलोन आला नाही येवद्या-मधे पाचा साताही सर्वांचे मत न घेता समस्ताचे नावे पत्र मुबईकरांस ग्या हावे तर न्यातीचे खावंद तेच जाले की काये येकतर हे कलम १

दुसरे तर याधव बाबाजी मुलेकर याण्हे गंधरव्याव केला तर हे आपल्यामध्ये पृथक पृथक दंडक आहे परतु त्याहीमध्ये भिन विचार की जे त्रीस सरीरसमंध कोण्ही नाही व पर-मुलकी आणोन करावी येसे असतां याण्हे गावाचमधे सरीरसमधी असतां केली तर यामुळे लोकामधे उबार राहत नाहीं त्यास म्हणतील की यामागे जाले की नाही तर त्याची उबार ···ली ते विदित जाली म्हणोन काये बहूतच करावी तेही असो त्याण्हे दोघाचौघास विचारावे यामुले न्यातीचे वडील तेच जाले की काये १

या खेरीज दुसऱ्याही क्षुलग गोष्टी त्याचा काये हिसाब आहे तर त्याहा-वयास कारण की चोरलेकराचा कथला कोण्हे जरा थरास जाईल समथा आनुसार

तर बरे अथवा वाईट सर्वांचे पदरी येईल या उपर आम्हाखेरीज हे दोन विचार केले असत तर त्याचा आंगिकार त्याहीच करावा जेथे वोरलेकर असतील व त्याचा वंश असेल तेथे आंनवेवार न करावा जैसे फिरंगाणामधे वर्तणूक होते त्याप्रमाणे आपण चालावे जवर त्या निर्वाह होऊन येईल तवर पगत पदवी नाही व यादव मुळेकर याण्हे ज्याचे मते केले त्यास त्याचा आंगिकार त्याहीच करावा यैसे दोन विचार गृहस्थाचा लोप करून थोटाई केली तर यापुढे फारच करितील यामधे काही वेचले नाही भितील ते आपलाले...... जाईल याउपर या मतास जो सतबुध धरून आपले वाडावडिलाचे वर्तणुकीवर दृष्ट देऊन चालेल त्याण्हे या पत्रावर साक्ष घालावी आण ते जर काही अपराध पदरी घेतील तर त्याचा विचार ते सारिखा होईल व या पत्रावर निशांणी केल्यानंतर याप्रमाणे वर्तणुक करावी यास चाला चुकला तर देवब्राम्हणांचा दोषी होईल

नावनिसी

| | |
|---|---|
| पत्रप्रमाणे धोंडजी हिराजी प्रभु कबूल १ | पत्रप्रमाणे यादवजी माहादेऊ कबूल १ |
| चिमणाजी सवणाजी प्रभु १ | पत्रप्रमाणे प्राणाजी माहादेऊ १ |

———

ले. ३२ } हुं { शके १६५० भाद्रपद शु॥ ७
इ. स. १७२८ आगष्ट ३०

इजत आसार बाळाजी माहादेव देसकुळकर्णी मामले चेऊल मो यल माळूम बिदानद सु॥ समान इसरीन मिया व अलफ तुम्हास फर्माविले होते की चेवलचे आगरची पाहाणी सुरू होता रजा घेऊन येणे ते आलेत नाही पाहाणी आज दाहा वर्षी होत असे वाकीफगार वतनदार तर माळूम अजम सिदीची रजा घेऊन येणे की वाकीफगिरीने चौकसीने पाखाडी व वाडी हदीची हद पाहाणी जाली पाहिजे दीस गमावयास न करणे व सिदी अजमाचे खिा जाहीर करणे की मेढेखारीचे नख्ती बाबची चिठीची परवानगी जाली असेत व हुकूम केला आहे की इनाम सन···म्ही आसता···दिला···फिरजवा दिली याचा सबब काये असे ते जाहीर करणे व चिठी तर थोडकेच रोजी येऊ ·······कामिला माळूम असे जलदीने काम तम्ही सावकासी बगैर होत नाही चिठी येईतलग तगादा न लागावा म्हणोन जाहीर करणे व तुम्ही लवकर येणे रा छ ५ सफर सन ९ जलुस (फा. मोर्तब)

———

ले. ३३ } हु { शके १६५० मार्ग० शु. ६
इ. स. १७२८ नोव्हें. २५

देसमुखांनी व अदिकारीयान व देशपांडिये व बाजेजमीदार वतनदारानी कसबे चेऊल बदर मुर्तजाबाद उर्फ चेऊल सुा तिसा असरीन मिया व अलफ बापु जोसी चेऊलकर हुजूर येऊन अर्ज केला कीं" कसबे चेऊल धामधुमीचे सबबेने बहुत साले खराब पाडिले आले त्याचे मामुरीचे कौलाबाबे अर्ज केला व तुमचेही बाबे अर्ज केला कीं कसबे मारचे वतनदार व कदीम लोक धाम-धुमीमुळे जागजागां गेले आहेत ते कसबे मजकुरी कदीम जागेयास आलि याने दुसरेही लोकां येऊन आमदरफ्ती होऊन मांमुरी होऊन येईल म्हणोन अर्ज केला तर तुम्ही जमीदार कदीम वतनी जागेयाचे जागां येऊन आबादा-नी करून लोकांचा व रयेतीचा दिलासा देऊन वसाहत करून उदीम वेपार करून कौलमोजीब मांमुरी करणें आणि तुम्ही हुजूर येऊन रुजु होणें तुमचे मुदे मतालिब खातीरेस आणोन विल्हे केली जाईल तर कसबे मजकुरी येऊन उमेदवार होऊन वसाहत करून आबादानी करणें ताकीद समजणे पा हुा रा बाबु (?) जबानीं सुद रा छ ४ छ माहे जमादिलोवल (नि. अ.) मोर्तब सुद

बार सुद. फा. मोर्तब

( अन्यकालीन मजकूर याच कागदावर लिहून ठेविला तो* ) सिदी सुरूलखान सो सेकीन दंडा राजपुरी कौल घेतले परतु सेवटास गेले नाही.

---

ले. ३४ } श्री { शके १६५३ ज्येष्ठ वा २
इ. स. १७३१ जून १०

र्द मा अनाम माणकोजी अदकारी चेऊल यांसि बाजीराऊ बलाल प्रधान सुहुर सन इसने सलासीन[1] मया अलफ तुमचा किंतेक अर्थ राजश्री रामाजी मलार यांणी विदित केला त्याजवरून कळले असीयांस तुम्हां वतनदारांची वतनावरी पूर्ववत प्रो स्थापना करावी हे अवश्यक आहे तदनुरूप केले जाईल हाली मारनिलेस रवाना केले आहे यांचा कितेक कार्यभाग जाहाला पाहिजे त्यास तुम्ही साह्य··· ·········ते आणणे असतील ते आणून·········१ मारनिले भाद्रपद मासी हुजूर येतील त्याजबा तुम्हीं दर्शनास येणें वर्तमान मनास आणून जे आज्ञा कर्तव्य ते केली जाईल (नि. अ.*) जाणिजे छ १५ जिल्हेज पा हुजूर लेखन सीमा

(शिक्का: • श्री ~ राजा शाहु नरप ति हर्ष निधान बा जीराव बळाळ मुख्य प्रधा न)

---

१ ·········तुटक तेथें फाटून नष्ट.

ले. ३५ } श्री { शके १६५४ भाद्र. शु. ६ चे पूर्वी
इ. स. १७३२ सप्टे. ६ पूर्वी

राजश्री बाळाजीराव व रामाजीराव अदीकारी
चेऊल गो यास

दं अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य (मो.जा.) श्रोा जिवाजी खंडेराव चिटणीस रामराम उपरि येथील कुशल जाणोन स्वकीये कुशल लिहिणे विशेष तुम्हीं पत्र पाठविले ते पावोनं वर्तमान कलो आलें आपले उर्जिताचा मजकूर लिहिला येसीयास तुमच्या कामास कोणेविसी अतरा(य) होणार नाही आपले समाधान असो दीजे (नि. अ.) बहुत काये लिहिणें हे विनती

श्री
लेखन
सीमा

( मागील बाजूस बदामी शिक्का )

श्री ०
बाळाजी प्रभु पु
त्रस्य खंडरावस्यधी
मतः मुद्रा सर्व गुणो
पेतां राज सन्मान
वर्धिनी

---

ले. ३६ } श्री { शके १६५४ भाद्र. शु. १३
नकल. इ. स. १७३२ सप्टें. ६

स्वस्ति श्री राज[redacted]षेक शके ५९ परिधावि संवत्सरे भाद्रपद बहुल त्रयोदसी भोमवासरे क्षेत्रिये कुळावतंस श्री राजा शाहु छत्रपती स्वामी याणी समस्त राजकार्य धुरधर विश्वासनिधि राजमान्ये राजश्री सेखोजी आंगरे सरखेल यांसी आज्ञा केली ऐसी जे माणकोजी अदकारी व मावजी अदकारी मामले चेऊल याणी हुजूर येऊन विनंती केली की आपले वतनाचें हक सुदामत आहेत ते दिवाणांत जमा होतात आपणास पावत नाहीं यामुळे उपजीविका चालत नाही कुटुबवत्सल आहों सुदामतप्रमाणें हक चालऊन योगक्षेम चाले तें करावें म्हणून त्यावरून मनास आणितां कदीम वतनदार यांचे हातें वतनी सेवा घेऊन चालवावें हें उचित ऐसें जाणोन तुम्हास हें आज्ञापत्र सादर केले आहे तरी अदकारी मजकूर याचे हातें दंडक प्रमाणे वतनाची सेवा घेऊन सुदामत सिरस्ता हकाचा असेल तर त्याप्रमाणे चालवणे येविसीं पूर्वीही तुम्हास आज्ञापत्र सादर केलेच आहे पुरातन वतनदार आहेत त्याचे हातें वतनी सेवा घ्यावी

हे स्वामीस अवश्यक आहे तरी याचे हातें सेवा घेऊन चालवावयास अंतर न करणे जाणिजे बहुत लिहिणे तरी सुज्ञ असा

---

ले. ३७ } श्री {शके १६५४ भाद्र. शु. १३नंतर इ. स. १७३२ सप्टेंबर ६ नंतर लगेच

पुा राजश्री माणकोजी अदकारी व भावजी अद(का)री मामले चेऊल गोसावी यासि

विनंती उपरि आम्ही राजश्री चिमाजी आवां याजसमागमे भाद्रपद मासी सातारीयांस गेलो होतों बा पिलाजी जाधवराऊही होते त्यास तुमचेविशी राजश्री (मो. जा.) छत्रपती स्वामीस विनंती कर्तव्य ते रीतीनें केली राजश्री (मो. जा.) स्वामी कृपाळू होऊन राजश्री (जा)धवराऊ यांस कित्येक आज्ञा जा···कुटुंबाचा यौगक्षेम चालेनासा जाहाला शामलाचा पक्ष म्हणावा तर त्याचाहीं पक्ष नाहीं सिपीभर धान्यास अजीज जाहालो तेव्हां राजश्री (मो. जा.) छत्रपती स्वामींकडे चाकरीच्या उदेसे गेलों त्यांणी ठावठिकाण विचारिला तेव्हां चेऊलचे अदकारी म्हणोन सांगितले येक दोन मास सिकारी सा सदरेस श्रमही केलें चाकरीस ठेवीत नाहीं तुमचेविशी रा। सरखल यांस लिहितों तुम्ही तेथे जाणे तुमचे वतन ते चालवितील म्हणोन आस्वासन पुरस्कर राजश्री···स्वामीनी आज्ञा केली ते समई राजश्री······व पिलाजी·········राजपत्रही घेतले असे तैसेच राजश्री जिउबा चिटणीस याचा व राजश्री··सरखेल यांचा घरोबा आहे त्याचीही पत्रे घेऊन पाठविली आहेत मुजरद जासुदाबा। परभारी पाठवावी तर तुम्हांस कळलीं नाहींत दुसरे तकडदी कारभार दिसतो यास्तव तुम्हांचकडे पाठविली आहेत बहुतसी मायावादेकरून लिहिली असे या पत्रांस जीव आणावयाचा विचार भावजीबावा येसा करणें की तुम्हास राजश्री...सरखेलीनी व राजश्री रघुनाथजीने विचारिले तर तुम्हीं त्याजवळ भाषण करिता येसे करणे की आपले वतन जफ्त जाहाले······सले होतें त्यासही क[लोन]······[आ]ज्ञा केली त्याणीही आपले समाधान करून पत्रे दिल्हीं ते सेवेसी घेऊन येत असतां मातारास्च वरे वाटेनासे जाहाले दोन मास हैरान जाहाला टाली कांहीं बरे वाटो लागलें आणि सेवेशी आलो आहो सर्वप्रकारें साहेबीं चालवावें साहेबाखेरीज गत्यंतर नाही म्हणोन नम्रभावे विनीत होऊन विनती करावी म्हणजे खामखा तुमचे कामच होईल यांच रीतीने विनती करणें याहून विशेष अथवा नून्य न बोलणें हे विनती[१]

---

[ १ पत्राचे चार तुकडे दफ्तरांतून हुडकून काढून जोडून येथें देत आहे. त्यांत अक्षरें फाटलीं तें तुटक रेषेनें दर्शविलें आहे. ]

ले. ३८ } श्री { शके. १६५५ ज्येष्ठ शु. ४
इ. स. १७३३ मे ६

श्री शिव च
रणि सादर तुको
जी सुत कान्हो
जी आगरे नी
रतर[1]

( दशबुर्जी मुद्रा )

आज्ञापत्र राजश्री (मो.जा.) सरखेल ता। कारभारी व रयान मा। चेऊळ सु॥ सलास सलासीन मया व अलफ तुम्ही धामधुमीच्या प्रसंगामुळें तजावजा जाहाले आहा म्हणून विदित जाले तर कोणे गोष्टीचा अंदेशा न धरिता गावी सुखरूप राहाणे अभये असे छ २ माहे जिल्हेज (लेखन सीमा) [ अष्टदली ]

---

ले. ३९ } श्री { श. १६५५ अ. आषाढ शु. ११
इ. स. १७३३ जून १२

श्री
श्रीशाहु नृपति प्री
त्या तुकोजी तनुजन्म
ना ॥ कान्होजी सरखे
लस्य मुद्राजय
ति सर्वदा

अभये पत्र समस्त राजकार्ये धुरंधरं विश्वासनिधि राजमान्य राजश्री सेखोजी आगरे सरखेल ता। उदमी व्यापारीयान सु॥ आरबा सलासीन मया अलफ तुमचेविसीं जमीदार मामले चेऊळ याणी हुजूर येऊन अर्ज केला जे उदमी मजकूर चेऊळास येऊन उदीम बेवसाये करीत होते हालीं राजपुरीचा दगा जाहला व राजकोट चेऊलचा साहेबी घेतला याकरिता उदमी व्यापारीयास कौल सादर जाल्याखेरीज शक दूर होऊन कोण्ही येत नाहीं तरी साहेबी त्यांस अभये पत्र सादर केले पाहिजे बेशक येतील म्हणून त्याजवरून अभये पत्र सादर केले असे कोणेविसी शक अंदेशा न धरितां वस्ती करणे व उदीम व्या(पा)र जलमार्ग व खुषकीने जैसा जो करील तो सुखरूप करणे कोणेविसी शक न धरणे अभये असे ( नि. अ. ) छ १० मोहरम (मोर्तब सुद)

---

[1] कान्होजीचा शिक्का व मोर्तब दोन्ही मेहरापींतील.
कान्होजीचे अनेक शिक्के असावेत.

ले. ४० } श्री { श. १६५५ आषाढ पौर्णिमा
इ. स. १७३३ जुलै १५

राजश्री लक्ष्मण आपाजी मो चेऊल यांसि सेखोजी आगरे सरखेल सुहुरसन आर्बा सलासीन मया अलफ विनतीपत्र पाठविले त्याची आज्ञा

कोळी पाळभाटकर याची घरे जळाली सबब साल मजकुरी निमे घरटका करार केला असे निमे वसूल करणे

खार बंदी येथील जदीद मोहतर्फी खुमास टीप होये तोपर्यंत घरटकेयाचे तोष्ट न लावावे जुनी कुळे घरे जळाली आहेत त्यासी घरटका निमे घेणे

जाणिजे छ १४ माहे सफर (मोर्तब सुद)

---

ले. ४१ } श्री { श. १६५६ चैत्र शु॥ ५
इ. स. १७३४ मार्च २८

श्री

श्री शाहु नृपति प्री
त्या तुकोजी तनुजन्म
…कान्होजी सरखे
लस्य मुद्रा जय
ति सर्वदा

अभयेपत्र राजश्री (मो.बा.) सरखेल ता। माली जदीद का चेऊल सु॥ आर्बा सलासीन मया अलफ दिले अभयेपत्र यैसे जे आपण राजपुरी प्रांताहून का मजकुरी येऊन माग घालून उदीम करावयासि उमेदवार असो म्हणोन तुम्ही व तुम्हचेविसी अधिकारी याही हुजूर येऊन विनती केली त्यावरून सालिना देखील बती महसूल दर भागास

रुपये
३ लखमाजी सातपुत्या
३ येसजी भाबेकर
३ हरबाजी भंडारी
३ सटवोजी मोहला
३ बाळाजी भंडारी
३ घोडजी काजवा
१८

येकूण अठरा रुपये सालिना करार करून अभयेपत्र सादर केले असे सदरहु पैकी साल मार हा फालगुन मास तीन माही दर असामीस रुा ।॥ प्रा॥ उगवणी करणे पेस्तर सालापासून सरसाल सदरहु प्रा उगवणी करून

माग लाऊन आपला उदीम करीत जाणे कोणेविसी शक अदेशा न धरणे अभये असे छ ३ जिलकाद मोर्तब सुद

---

ले. ४२ नकल } श्री { श. १६५७ कार्तिक शुा ८ इ.स. १७३५ ऑक्टो. १३

श्रीमंत माहाराज राजश्री दिवाण साहेबांचे सेवेशी

आज्ञाधारक सेरीकर रयेत लोक पाठारे पांच कलसे सुभा प्रांत चेऊल सेवेसी विज्ञापना साश्ट प्रगणे यास फिरंगीयाने बल···करून आपली यात आधीक व्हावी म्हणोन मऱ्हास्ट लोक याना यातीचें जन भ्रस्ट करून किरिस्तांव केलें त्या लोकांमधून आमचे यातीचे लोक च्यालीस पनास घरें बाटविलीं तीं घरें कितेक मुदत त्याचें जातींत वर्तलीं तें कळत नाहीं त्यांमधून दाहा वीस घरें तें स्थल सोडून हे स्थलीं प्रांत मजकुरीं येऊन सुखवस्तीस राहिलीं कितेक दिवसानंतर आपले पूर्व जातीत यावे हा हेत धरून कितेक प्रकारे घालमेल वसिला उपराला करून आमचे जातीचें पदरीं पडले कीं आम्हास यातीत घेणे जो खर्चवेंच होईल तो देऊन त्यास यातीनी अंगीकार केला नाहीं त्या उपर कितेक मुदत जालियावर कारकीर्द माहाराज (मो.जा.) छेत्रपत्री साहेबांच्या राज्यांत कितेक घालमेल करून बजीद होऊन कतीकाना जातीत घ्यावे म्हणौन सनद घेतली ते प्रसगीं आमचे वडील सर्व यात समुदाव मिलोन माहाराजाचे सेवेसी विज्ञाप्ती केली कीं, साहेबांची आज्ञा सिरसा आहे पर येत कती कोम ! यांचे मूळ पुरुश प्रथम भ्रष्ट जाहाले होते ते जातीत घेतले असते तर कार्यास येतें हाली लोम प्रतिलोम पेढी दर पेढी चालत आली त्यांचे नांव व त्यांचा धर्म निराला जाहाला असतां पूर्वजातीत मिळते करून जातीस लंछेन लाऊन घ्यावें येसा अर्थ नाहीं अथपर देवधर्मांचें सवरक्षेण करणार साहेब धनी आहेत त्याउपर माहाराज साहेबीं विवेक चितांत आणून हे गोस्ट अमान्ये केली त्यास कितेक वर्षे जाहालीं यानंतर माहाराज कैलासवासी (मो. जा.) आबासाहेबांचे सेवेसी विज्ञापना करून आंज्ञापत्र घेऊन आम्हा समस्तांस हुजूर नेऊन बोलीचाली होऊन माहाराज साहेबीं आज्ञा केली कीं कती कोम ! यास यातीं घेणे त्यावरून प्रति उतर अर्ज केला कीं उत्तम बरें साहेबांची आज्ञा आम्हास मान्ये असे सिरसा आहे पर येत साहेब आमचे धनी परंतु शेरीस मख गोताईमुळे साहेब आमचे जांवाई आहेत साहेबांचें आमचे गोत गंगा येक आहे कती कोम ! यांस आज्ञा करून सर्व जातीस जेवण करऊन साहेबी आपणासमवेत गोत जेवण करून जातीत वर्तावयाची आज्ञा करणे त्या उपर महाराजसाहेब ख्याल खुशालीत येऊन आम्हांसंगे विनोद करून कितेक गोस्टी केल्या आण म्हणो लागले कीं बेटे हो

आम्ही तुमचे जांवाई कैसे त्या उपर सेवेसी अर्ज केला कीं चेऊलकर अदीकारी व आम्ही शेरीसंमधी असों चेऊलकर अदकारी व गाव्हाणकर व आमचे जांवाई दिनकरराऊ हानोळकर सेरीसंमधी आहेत साहेब दिनकरराऊ यांचे जावाई ते येसा साहेबांचा निशा करून आपल्यावर मेहरवान करून घेतलें त्या उपर कती कोम ! यांचा गौरव केला कीं तुम्ही आपले मुलांमाणसें पोटीं गर्भ असेल त्यासमवेत श्रीमाहाक्षेत्र (मो.जा.) वा(रा)णसीस जाऊन तेथील यात्रा करून तेथील मोक्ष्या घेऊन येणे त्याजवर जे आज्ञा करणे ते केली जाईल येसें बोलोन सर्वांस विडे देऊन विदा केलें त्यावर कतीकोम ! आपले घरीं जाऊन संवसार करूं लागले त्यास कितेक वर्षें गेली त्यामागोन देवधर्म रक्षेण गौब्राह्मण प्रजापाळण माहाराज साहेबीं अवतार घेऊन सकल छेत्ररयें निर्दाळून येकछेत्री राज्ये करून देवधर्माची वृधी वाढवून आम्हा प्रजेचें सवरक्षेण करीत असा येण्हे करून सकल जन संतोसी होऊन साहेबांचें राज्ये लक्षुमी आंयुश्ये सदा सर्वदा वृद्धी होऊन साहेबांची छाया आमचे मस्तकीं निरंतर असावी हे श्रीजवल सदा निरंतर इछीत असों हाली किरिस्तांव कतीकोम जातीविसीं साहेबांजवल बजीद जाहाले असत हे गोस्ट आईकोन शेरीरीं कस्ट होऊन चित्त उदास जाहाले असे तें श्री (मो.जा.) साक्षे असे हे कतीकोमास कितेक मेळ्या व कितेक मुदत जाहाली हे कलत नाहीं आबासाहेबांचे अमलात देवधराहून कतीकोमाची सोहरोक गोलदाज फिरंगीयास दिली होती येसें असोन ते यात आमचे यातीत येईल तेव्हां श्वदेस उतम आहे तो सांडून परदेश कदाचिद्रुघट असला तर तो कार्याचा आहे हेविसी सेवेसी आधिकोतर विज्ञाप्ती करावी तों साहेब धनी खावद असत आमचे यातीचें व धर्माचे रक्षेण करून पूर्व प्रमाणें चाले आण आम्हां प्रजेचें समाधान होये तों हुकूम करणार साहेब धनी आहेत हे विज्ञाप्ती

तेरीख ७ रोज माहे जमादिलाखर सुा सीत सलासोन मयां व अलफ.

---

ले. ४३ } श्री { श. १६५७ मार्ग. शुा २ इ. स. १७३५ नोव्हें. ५

र्द माा अनाम अदीकारी ताा चेऊल यास मानाजी आंगरे सुा सीत सलासीन मया व अलफ काा खांडाले येथील पाटीलकीची मनसु(बी) होणे असेत यास्तव तुमचे प्रयोजन असे तरी हुजूर येणे जाणिजे छ ३० माहे जमादिलाखर मोर्तब सुद

- श्री ०
श्री शाहु नृपति प्री
त्या तुकोजी तनु जन्म
ना । कान्होजी सरखे
लश्य मुद्रा जय
ति सर्वदा

———

ले. ४४ } श्री { श. १६५८ ज्येष्ठ शु॥ ९
नकल } { इ. स. १७३६ जून ६

दं मा॥ अनाम देशमुख व अधिकारी व देशपांडिये मामले चऊल यासि मानाजी आंगरें सुहुर सन सबा सलासीन मयां व अलफ राजश्री जिवाजी खंडेराऊ यांचे सरदेशमुखीचें वतन मामले मजकुरीचे पुरातन आहे त्यास मा॥रनिलेचें वतन चालवणे अवश्यक जाणोन वतनाच्या सनदा तीर्थरूप राजश्री कैलासवासी (मो.जा.) यांच्या सादर जाहाल्या आहेत त्या हाली मनास आणोन मामले मजकुरीचे सरदेशमुखीचें वतन यांचे दुमाला करून जमाबंदीस हक व इनामती बीतपसील

हक गांवगना नख्ता व गलियास देखील बागायेत व खंड वगैरे महसूल पैदास कमा॥वीस जकायेत मोहोत तर्फा व बाजेबाब यासि दाहोत्रा प्रमाणे दिवाणांत वसूल होत होता तो रयेत-निसबत देविला असे बा॥ सनद रुजुवात तीर्थस्वरूप कैलासवासी

इनामती कुलबा (व) कुलकानु हालीं पटी व पेस्तरपटी खेरीज हकदार इनाम दिल्हे असे—

इनामगांव
१ मौजें वरडें बाग राउलवाडी
ता॥ बाम्हणगाव माहाल आगसी
२ ता॥ श्रीगांव १
—— १ कुरकुंडी
३ १ कालटेंबी
——
२

येणेप्रमाणे हक व इनामती सरकारांत जमा होत होता तो याजकडेस द्यावयाची आज्ञा करून हें पत्र सादर केलें असे तरी तुम्ही यांस रुजु होऊन सदरहुप्रमाणे चालवीत जाणे वतनाचा भोगवटा मा॥रनिले पुत्रपौत्रादि वंश परंपरेने करितील दरसाल ताजे सनदेचा उजूर न करणे पत्राची नकल घेऊन असल पत्र भोगवटीयासि फिरोन देणे जाणिजे रा॥ छ ७ माहे सफर.

---

ले. ४५ } श्री { श. १६६० वैशाख शु॥ ९
} { इ.स. १७३८ एप्रिल १७

दं मा॥ अनाम बालाजी आपाजी अदकारी मा॥ मुर्तजाबाद उर्फ चेऊल

- श्री ०
श्री शाहुनृपति प्री
त्या तुकोजी तनुजन्म
ना कान्होजी सरखे
लस्य मुद्राजय
ति सर्वदा

यांसी मानाजी आंगरे सुहुर सन समान सलासीन मयां व अलफ तुमचा हक सरकारी जमा आहे या मुळे गुजरानी चालत नाहींसी जाहाली याजकरितां हुजूर येऊन अर्ज केला की आम्ही जमीदार आहो आमचे हातेन सेवा घेऊन आमचा योगक्षेम चाले ते आज्ञा करण्हार साहेब धनी आहेत म्हणून त्याजवरून हक-

टक पेशजी प्रो देऊन वतनाची सेवा तुमचे हातोन घ्यावी तरी मो मारचे सारेच जमीनदार हक सरकारी जमा आहे त्याची विल्हे होईल तेव्हां तुमची होईल प्रस्तुत योगक्षेमानिमित्य जमीन करार केली असे विघे

१४ वतन समंधे विघे

६ येकनिष्ट सेवा केलीत सबब

२०

येकूण वीस विघे पड जमीन चोखी मामले मजकूर पैकी करार केली असे जे गावी अनकूल पडल ते गांवी कीर्द करणे तुमचे निसबत कीर्द असेल व पेस्तर होईल त्यापैकी दाहाखंडी भात धारे मापे तुम्हांस इनामखर्चे सालब-साल पडत जाईल तरी तुम्ही उमेदवार होऊन वतन समंधे सेवा चाकरी येक-निष्टपणे करीत जाणे जाणिजे (नि. अ.) रा छ ८ माहे मोहरम (मोर्तब सुद)

(कागदामागें) बारसुद

---

ले. ४६ | हु | शके १६६१ भाद्रपद वद्य ११
इ. स. १७३९ सप्टें. १७

खान अजम ताजुदिन अलिखान दाम महबत हु

दा मुलाज मेहरबा इस्तजहर मुखलिसां······अर्जी बाजीराव पंडित प्रधान दुवा आर्का येथील खेरखुशी जाणून मोहिबी आपली खुशवख्ती हरवख्त कलमीं करीत गेलें पाहिजे दिगर मोहिबी बाबूभट याजबराबर नवीस्ता मरसूल केला तो नेकवख्त पोहचला खुशवख्ती रोयेदाद जाली हमेशा येच बबाने आपली शादमानी करीत गेले पाहिजे बादज फरगियाचा मजकूर निगार केला ······व त्याचे खत आले होते तेच बजिनस पाठविलें त्याजवरून व मशार-निलेव्हा जबानीवरून मुफसल मालूम जाहालें फिरगियाचे दिलांत गुबार फारसा आहे तें आपले करणीस अंदेशा करीन नाहीं मोहीब हरवख्त कलमे करितांत कीं फरगियाचें दरगुदर करून खलकुलाचें बरें होये तें करावें व इजानेबाचेही दिलांत हेच कीं आलम गरीब गुरबाचें बरें होऊन त्याची दुवा घ्यावी त्यातच फाइदा येसें समजोन दरगुदरच होत गेलीं त्यामुलें फरगी फारच वहमियांस चढोन इमान आपण येक होऊंन वासी व पणवेल वगैरे बंदरकडील जागे खराब केले आहेत त्यास हालखुद ठेवावें हे जरूर आहे व त्याकडोन तहस मातबर मेउलास येणार आहेत ते येतील आपलेही मातबर येथें पाठवण सुलाचा मुकादिमा करारमदार करणे करू म्हणून कलमी केलें तरी बेहत्तर आहे त्याज-कडून मातबर आलियावर कलमीं केले पाहिजे येथून मातबर पाठवणे ते पाठविले

जातील जरी याजकडून मातबर यावया दरगुदर जाली तरी इजानेवांस आणीक मोहीम आहेसी नाहीं तरतूद करणें ते केली जाईल ये बाबेची खत मोहिबी वरचेवरी कलमे केली पाहिजे दुतर्फा तह होऊन मुलकांत आबादी जाली तर किफाईतच आहे त्याणी या बाबे नवदिगर करितील वहमियास चढलिया वहमा राहीलसा नाही पैरवी होणे हे...ये बाबे फरंगीही खूबवजाने समजतच असतील व समजतसेही केले जाईल इजानेबीं तों आपले तर्फेने आजलग तफावत केलीं नाहीं तेच तफावत करीत आले व करितांत तर काये मुजाइका आहे मोहिबांचे दिलात खललांचें बरें व्हावें असां हे बात···चे दिलात नाही त्यास मोहिबांचा इलाज काये आहे जाणिजे रा छ २४ जमादिलाखर जियादा काये लिहिणे हे किताबती

---

ले. ४७ } श्री { श. १६६१ मार्ग शु. १२
इ. स. १७३९ नोव्हें. ३०

राजश्री पाहाणीदार ता। झिराड यासि आज्ञा सुा आर्बैन मयां व अलफ बाळाजी माहादेव देशकुलकर्णी जमीदारीचे पेशाने पाहाणीचे कामावरी पाठविले आहेत तरी माहाळ हाये देखील पाहाणीचे कामावरी फिरतील यांची रुजुवात घेऊन पाहाणीचे काम चाळववणे (नि.अ.) रा छ ९ माहे रमजान (मोर्तब सुद)

---

ले. ४८ } श्री { श. १६६२ आश्विन वा ९
इ. १७४० ऑक्टो. ३

श्री
श्री शाहु नृपतिप्री
त्या तुकोजी तनु जन्म
ना ।। कान्होजी सरखे
लस्य मुद्राजय
ति सर्वदा ।।

आज्ञापत्र समस्त राजकार्ये धुरंधर विश्वासनिधी राजमान्ये राजश्री ता। ज्ञात कराडे स्वारी···सुा इहिदे आर्बैनमियां व अलफ कान्होजी कुलबी कराडा वाईकोचे समधानिमित्य जाती वेगला आहे त्याविसी आज्ञापत्र सादर केले आहे तर तुम्ही ज्ञात अदकारियांकडे जाऊन का···जिची हकीकत सविस्तर आहेत मनास आणून हुजुर येऊन विदित करणे त्याप्रमाणे आज्ञा करणे ते केली जाईल ( नि. अ. ) छ २२ रजबु (मोर्तब सुद)

---

ले. ४९ } श्री { श. १६६२ कार्तिक शुा १२
नकल } सिका { इ. १७४० ऑक्टो. २१

अभयेपत्र समस्त राजकार्ये धुरधर विश्वासनिधी राजमान्ये राजश्री बालाजी पंडित प्रधान ता चौगुले व समस्त भंडारी व बाजे उदमी खुम साकीन रेवदंडा सुा इहिदे आर्बैन मया व अलफ दिल्हे अभयेपत्र ऐसे जे फिरंगियाने रेवदंडे कोरला सरकारी दिल्ही आहे तुम्ही कोणेविसी शक न धरिता आपले जागा काईम राहाणे तुमचा गौर करून चालविले जाईल अभये असे जाणिजे छ १० साबान मोर्तब

---

ले. ५० } हु { शके १६६३ ज्येष्ठ
} { इ. स. १७४१ जून–जुलै

दंाा इजत असार नेक अतुवार रामाजी आपाजी हवालदार तो तुडिल मालुम विदानद के सुा इसने आरबैन मियां व अलफ उकी तुम्ही अर्जदास्त पाठविलीत ते पोहोचोन हकीकत मालुम जाली गलेया पैकी जो जमेदरासोबत रुा १४ चौदा पाठविलेत ते पावले व दोन खडि घाटी उडीद डाणे या बदल घेतले असत म्हणोन मालुम जाले त्यास हाली तो खिजाड आऊ रवाना करावयाचा हगाम राहिला नाही बैल करोन दाहा मण उडीद मैसले यास पावते करणे हर इलाज करोन डाणा पावता करणे डाणे याची हैगै कराल तर घोडा भुके राहील याजकरितां बरसात हाली सुरू जाला असे इतकेयात········ने दाणा दाहा मण रवाना करणे व गलेयाचा व नकदीचा झाडा पाठविलात नाही हिसाब खिताब तो मालुम होत नसे हाली कुल हिसाब करोन जे बाकी निघेल ते झाडून झाडून वसूल घेणं येथे अडिसेरी बदल बहुत तसदी आहे व लोकाचे देवघेव पडून असें गयाल कुलेंयाकडे बाकी राहिली असें ती कुले हाली तपे मारी आणिली असत त्यात तुम्हा दुतर्फा केली असें सरकार तर्फेन करावी म्हणोन लिहिलेंत तर हे साली सरकारात शादी जाली त्यामुळे खर्च बहुत जाला लोकाचे देणं पैसे आहेत त्यांही तसदी केली असे व अडिसेरीही लोकास असावी सरखेललाचे सरकार थोर आहे ते चाहतील तर बाकी माफ करितील इजानेदाऱ्याने बाकी त्याजकडे ठेविली जात नाही बेमुलाहिजा वसूल घेण देशमुखांकडे बाकी हकाचे अैवजाखेरीज बाकी रुा २५ व तीन खंडी गला राहिला असे त्याचा वसूल आज उद्या करिता देत नाही म्हणोन लिा तर हनोज वसूल काये सबब ठेविला होतात हाली वसूल बेमुलाहिजा घेणं या उपर ठेविलात तर खुदनिसबत भरोन घेतला जाईल व गोवेलकोटाहून तपेयास तसदी लागतो म्हणोन लिा तर त्याचीही चिठी पाठविली जाईल खातरजमेयाने

राहाणे मागाहून पाठऊन देऊन व गिरो घातले आहे त्यावर व्याज चढत असें तुमचे भरवसेयाने आजपावेतो ठेविले असे तर गलेयापैकी बाकी जे निघाली असेल ते बेमुलाहिजा वसूल घेऊन रवाना करणे ताकीद समजणे यादव हिराजी कारकून यासी पेसजी रुा सतराची वरात दिली होती त्यास आजपावेतो पावले नाही हाली गले यापैकी निमे व निमे नकदी पैकी पावते करणे व यादवजी तेथे जितके रोज राहातील तितके दिवस दरमाहा दीड मण प्रमाणे दरमाहा अडिसेरी देणं ताकीद जाणणें कारण हे साली सरकारात मुत-लक नसे दोन मण काटाण मैसेल्यास रवाना करणे जाणिजे दरिविला मालुम जाले की ये साली वरताला सुदामत खडीस पाच मण घेत होते त्यास साल मारी कमी घेतला आहे म्हणोन मालुम जाले तर हे दानाईची बात केलीत नाही रयेतीवर बाकी काढोन ठेवणे व बेमुलाहिजा वसूल घेणें कोणी याबदल माने होतील तर बखेडा पडल (* कागदावर मागील बाजूस समासांत) व तुम्हास खुद निसबत भरणे पडल येकीन जाणणे व चौकी व काटाण ठिकाणे लाऊन हिसाब घेऊन हुजूर येणं ताकीद समजणे बाकीचा झाडा करणे जाणिजे (कागदावर पुढील बाजूस समासांत*) तेलाबद्दल कुपा पाठविला असे तेल गाळून कुपे यात ठेवणे व··पाईवाटे रुा करणे सिवडीस काम लागले असे

———

ले. ५२ } श्री { शके १६६३ अधिक श्रावण वद्य ६ इसवी सन १७४१ जुलै २२

श्री ०
शाहु कार्य धुरंध
रं: कान्होजी तनुज
न्मनः मुद्रा वजारतमा
बस्य मानसिंह
स्य राजते[१]

दस्तक सरकार रा (जश्री) मानाजी आंगरे वजारतमाब बनाम आर-मार करीयान व ठाणेदारान व चौकींदारान व कमाविसदार बंदरहाये सुा इसने आर्बैन मिया व अलफ महागिरी बंदर थल तांडेल लखमा कोली कृष्णाजी फाटक व्यापारी बंदर मार माहागिरी भाडे भरून बंदर सुरतसं रवाना जाली असे बंदरात व मार्गी कोन्हेविसी उपद्रव व अटकाव न करितां जाऊ येऊ देणे छ १९ जालीवल (मोर्तब सुद)

———

१ हा मानाजीचा एक वेगळा शिक्का दिसतो

ले. ५३ श्री {शके १६६३ आश्विन शु. १३
{इ. स. १७४१ ऑक्टो० ११

( लंब वर्तुलाकार
मानाजी आंगऱ्यांचा संस्कृत अस्पष्ट शिक्का* )

आज्ञापत्र राजश्री मानाजी आंगरे वजारतमाब ता। कारभारी व पाटेल

| | |
|---|---|
| १ बालाजी अदकारी | १ गण माहात्रा |
| १ कृष्णाजी अदकारी | १ गोप माहात्री |
| १ बाळाजी देसाई पा। नागावें | १ येस मा...कावीर |
| १ सकराजी माहाजन | १ राम म्हात्रा |
| १ वहीर वर्तक | १ बाळ म्हात्रा द(व)र |
| १ बाल म्हात्रा | १ बाबा म्हात्रा बाम्हणगावकर |
| १ व्हीटल म्हात्रा | १ गोंद पा। खानव |
| १ माहाद राऊत | मल्याण |
| १ हरबाजी जोसी | १ बाल म्हात्रा....? |
| १ नवर वर्तक आकसी | १ येस पाटेल वरडें |
| १ विटोबा कातरणे | १ वेंट म्हात्रा |
| १ येस घरत | १ पाटेल व्या पाळे ? |
| १ अंत घरत | १ येस म्हात्रा |
| १ जीव पाटेल बेली चेऊळ | १ येस कवल्या नागावें |
| १ रङग वर्तक | —— |
| १ हीर पाटेळ | १३ |
| १ बाबाजी वर्तक | |
| —— | |
| १७ | |

प्रा। चेऊळ सुा। इसने आर्बेन मया व अलफ मो। खाहाण ता। बाम्हणगाव व मो। ढवर ता। खाडालें हरदु गावकरी यांचा सिवेवरून पेसजी कलह कलह लागला होता ते समई हुजरुन चौवेजण नेमून देऊन कजिया सीव निवडऊन चुकविला असतां सांप्रत हरदु गावींचे पाटेल हुजूर येऊन सिवेचा कलह विदित केला त्यावरुन तुम्हांस आज्ञापत्र सादर केलें असें तर तुम्ही जाऊन येथान्याये सिवेचा निवाडा करून सीवझाडा हुजूर लेहून घेऊन येणे पेसजी निवाडा जाला होता त्यास नौदिगर कोणापासून जालें व पेसजीचे निवाडे यास कोणे गावीची सीव कोणे गावाकडे गेली असेही खरे करून मनास आणून येणें सदरहू दोन्हीं गाव दो तऱ्याचें तेव्हा तऱ्याची सरहद सीव मागेच कर्ता करावयास चुकला असेल ऐसें नाही तर चौकस मनास आणणें [ नि. अ. ]
रा। छ ११ माहे शाबान (मोर्तब सुद)

ले. ५४ } हुं { शके १६६४ माघ वद्य ७, इ.स. १७४३ फेब्रु. ४

इज्जत व सदाकत माब महमद इभराहीम मुरूसकर हवालदार व कारकून तो वुडल माळुम दानद सा सलास आर्बेन मियां व अलफ आकी अर्जदास्त पाठविली ते रसीदगी होऊन लिहिली हकीकत मुफसल मालुम जाली तुम्हीं तपे मजकूरचें कौलाबाबे लिहिलेंत व महाड तपेचे बे कौलाची हकीकत लिहिलीत तें मुफसल जाहिर जाली त्यांवरून खान अलिशा खान साहेबाचे (खिज)मतींत कौलाबाबें जाहीर केलें त्यांवरून फर्माविलें कीं दाहा···वांची राहा चालियाखेरीज कौल देत नाहीं अलबतां तुमचे···स्तीरदास्तीवर नजर देऊन तपे मजकूरचे···सट···सिकारीनें हरगाह छेडाछेड करणार नाहिं दर-मानें लिखापर्डे होतां त्यांची राहा चालियांवर कौलही दिला जाईल ते पावेतो रयेतीस जर रही पोचणार नाहीं हे वजानें जाब दिला आहे तर तुम्हीही रयेतीस दिलासा दिलदारी देऊ कोर्द मशागतीस लावणें कोण्हे बाबे फिकि(र)··· व कौलाचेही पैरवीमधे लागलो आहू इनशाला मुर्तजा कौलही घेऊन मागहून ···मजकुरास तसदी लाकली तरी त्याचा जाब आम्ही करून खातीरजमा असो देणे व पेसजी तुम्हां···रवाना केले का तें ते! तगाफुली करून रवाना केलेत नाहीं याकरितां तुम्हास पाच रुपये मसाला केला गेला होता अमां मोरोजीनें अर्ज केला···खातीरदारीवर नजर जेऊन माफ केला असे हाली कागद रवाना केळे आहेत ते भिकाजी वगैरे अदमियांजवळ देऊन रवाना करणें त्याचा स्वालजाब घेऊन रवाना करणें ताकीद समजणें पेस्तर ऐसी तगाफली केलियानें मसाला होईल ताकीद समजणें पेसजीचे कागद आहेत त्यापैकी तुळाजी आंगरे यांचा कागद हरणईस रवाना करून बाकी कागद हुजूर रवाना करणें व देसमुखांकडे बाकी तीन सालाची आहे त्याचा तगादा लाविला आहे अमां उजूर करितात की आपला हक आहे व ये बाबे त्यांही हुजूर लिहिले आहे म्हणोन तपसिलें लिहिले मालुम जालें त्यास आजतागायेत देसमुखाकड बाकी जे असेल ते बेमुलाहिजा वसूल करणे नाही तर तुम्हास जाब करावा पडल देसमुख हकाचा मजकूर करितांत तर हक तेच वख्तीं त्यास पोहचेल की सरकार तर्फे रूजू होतील ते वख्तीं जो हक देववणे तो सरकार सिदी...हल हाली ताकीद समजोन वसूल घेणें ताकीद समजणें...ये बाबे देसमुखास ही लिहिले गेले आहे देशमुखा(नीं)लिहिलें कीं तपे मजकुरास सोड दिली आहे ते मोजीब सरकारतर्फे(नें) सोड देऊन सनद सादर करविली पाहिजे तर देसमुखा(नीं) तिकडून सनद आणिली आहे ते सनद हुजूर घेऊन येतील ते वख्ती खातिरेस आणोन जाबस्वाल केला जाईल यैसें लिखेपढेनेच सनद कैसी देविली जाईल व माप वरताळेचे लिहिले की त्यांचे तर्फेने

दीड पाइली करार केली आहे ते मोजीब सरकारतर्फेने ध्यावयाचा हुकूम सादर जाला पाहिजे तर ते दीड पाइलीचे नाव करून तीन पाइली घेतात व घेतील सुदामत दोन पाइली मोजीब घेतात तेच मोजीब हालीही दोन पाइली मोजीब घेतात तेच मोजीब हालीही दोन पाइली वरतांला घेणें यास तफावत हरगाह न करणें व अंजनवेल तर्फेनें वसुलाची निकड होवी म्हणोन लिहिलेत तर ते काही तपे मजकुराचेच रयेतीस तगादा होतो यैसे नाही त्यांचा तगादा सारे मुलकास होतो अलबतां तुमचेच तपीयास तसदियां पोहचता तर त्याची राहा केली जाती हालीही त्याची जाबस्वाल करणें तो केला जाईल फिलवख्त तगादा त्यांचे तर्फेने लागणार नाहीं खातीरजमा असों देणे गला तयार केला आहे सिबड रवाना करणें म्हणोन लिहिली तरी सिबड थोडकेच रोजी येऊन पोहचेल गला दाणा जराबेजरा कुल वसूल करून दास्तान करणें त्यापैकी...साहेबांचा यैवज तक्षिमामोजीब वेगला तेथेच करून बाकी सरकार तक्षीम रवाना करणें जरा बाकी तपे मजकुरी राहिली तरी तुमचे जवलून घेतली जाईल येचाबे ताकीद समजणें व लकडें याबदल येथें लोकाही तगादा लाविला आहे याकरिता तुम्ही खुलगे खरीदी केले आहेत तर सिताबी करून लकडी आणोंन सिबड... रवाना करणें व भुरडाही गलबतास तयार करून ठेवणे व वि...भातावर पैसे घेतले आहेत त्यास वरीचे भात घेऊन वेगलेचे गलबतात स्वार करणे मा। जाफर याची कार...आहेत...दाहा रुपये अलबता पोहचते करणे व सरकारामध्यें पैशाचा जरूर दरकार आहे तर गल्याखेरीज हर तरतूद करून दाहावीस रुपये रवाना करणे गला विकणे दरकार नसे गला शाडियानसी रवाना करणे व कडदणही कुल रवाना करणें विगर हकीकत जवानी सेख मा। जाहीर करील रयेतीस तसली देऊन कीर्द मशागतीस लावणें कौलाबाबे हरगीज अंदेशा न करणें दरीबाब ताकीद समजणें रा। छ १९ जिल्हेज सन २५ जुलुस[1]

(फार्शी
मोर्तब)

---

ले. ५५ हु शके १६६५ कार्तिक शुद्ध ८
इ. स. १७४३ ऑक्टो १५

फार्शी शिक्का

कौलनामा अजदीवाण किल्ले उदेरी ता। रेवदंडेकर व प्रांत फिरंगाण व

---

१ महंमदशहाचा जुलुस

[ तुटक रेषा टाकल्या तेथें कांहीं अक्षरें नष्ट; कांहीं अस्पष्ट व कांहींचें वाचन करतां आलें नाहीं. ]

व वरघाट वगैरे मुलकी परमुलकी उदमी व्यापारी व यात्रेकरी यात्रा कनकेस्वर सुा आर्बा आर्बेन मया व अलफ कौल दिला. येसाजे गुरव येऊन किले मजकुरी अर्ज केला कीं कनकेस्वरचे पेस यात्रेकरी यास कौल सादर जालियाने लोक यात्रेस येऊन यात्रा भरेल त्यावरून कौल सादर केला असे तरीं सुदामतप्रमाणे यात्रेस सुखरूप कार्तीके पौर्णिमेस येऊन यात्रा करून जाणे कोण्हेवीचा शक अंदेशा न न धरणे बेशक होऊन यात्रेस येणे कौल असे जाणिजे रा छ ७ माहे रमजान ( नि. अ. ) सन २६ जुलस* ( फारसी मोर्तब )

---

ले. ५६ श्री { शके १६६६ वैशाख वद्य ३ / इ. स. १७४४ एप्रिल १८ }

श्रीमत् सकल तीर्थस्वरूप राजश्री दादासाहेब साहेबाचे सेवेसी.

अपत्यें येसाजी आगरें चरणांवर मस्तक ठेऊन दंडवत प्रां विनंती तागाईत छ १५ माहे रबिलोवल पावेतों वडिलांचे आसीर्वादें करून मौजे कालोस प्रा चांकण सुखरूप आसों मौजे मजकुरीं दाखल जालियावरी राजश्री पिलाजी जाधवराऊ यांजकडे पत्रे पाठविली मौजे चांडोलीस राजश्री सखोजी सावताकडे राजश्री अबाजी नाईक व संताजी चव्हाण पाठविले राजश्री जाधवरायांकडील पत्राचें उत्तर व रा राणोजी झेंडे व रावो शामराज लम्राचे साहित्यास पाठविले आहेत आबाजी नाईक व संताजी चाडोलीहून आलें चतुर्थीची तीथ नेमिली ते देवी निघाल्या म्हणोन राहिली आणि जेष्ट शुध प्रतिपदेस निश्चयेकरून राणोजी झेंडे फिरोन जाधवरायाकडे गेले रावोपंतास ठेऊन घेतलें रा आबाजी नाईकास नारोबा नाईक दाबके याजकडे पाठऊन देतों आगोदर त्यांसि पत्र लिहिलेंच होतें परंतु कापडांची उडवाउडव लिहिलीं आहे सेवट कैसा करितील पाहावें कापडाचा तों खर्च भारी आहे वडिलाचे पुण्य समर्थ आसे पुण्येप्रतापे कार्ये करून सेवेसी येतों लम्रास आवकास उदंड आहे याजउपरी आपण वाघोलीस जाऊन राजश्री जोत्याबास व सुभानबास व सौभाग्यादिसपनें आकाबाईस व चन्हवलीहून राजश्री भवानबास व सौ बयाबाई आपले आज्ञे प्रमाणें लम्रास आणून राजश्री बरवाजी पाटील यांसि पत्र पाठविले होते त्यांणी राऊता समागमे सांगोन पाठविले की तियनिश्चये जालियावरी पालकी घोडें पाठऊन देणे मुलीस पाठऊन म्हणोन राऊतासमागमे सांगोन पाठविले होते सविस्तर सेवेसी श्रुत होय आडिसेरीची मोईन येकरोजा खर्च आकारून सेवेसी पाठविला असे पुढें येक मास लागेल आडिसेरीची बेगमी आसावी त्याची आज्ञा करणार वडिल आहेत पेसवियांचे लम्रास ब्राह्मणसमुदाव भारी मिळल आहे तें लम्र जालियावरी हकबे ब्राम्हण

येतील तेव्हा दक्षणेस अैवज रुपये ५०० पाचसें आसावी बेगमी करणार वडील आहेत वडिलाचे नांवाबदल भिकारी भडंग भारी मिलेल सेवेसी श्रुत होये हे विज्ञाप्ती.

---

ले. ५७ (श्रीकार फाटलें त्यांत गेला) शके १६६७ ज्येष्ठ शु० ११ सन १७४५ मे ३०

श्री ०
शाहु कार्य धुरंध
तु कान्होजी तनुज
म्मना मुद्रा वजारत्मा
वस्य मानसिंव्ह
स्य राजते[1]

अभयपत्र समस्त राजकार्ये धुरंधर विश्वासनिधि राजमान्य राजश्री मानाजी आंगरे वजारतमाव ता। लखमा राऊत कोली दरेकर वस्ती चुने कोलवड का। चेऊल सुा। सीत आर्बैन मया व अलफ दिल्हे अभयपत्र असें जे रेवदंड्याचे कजिया मुळें गबरा कोइता याचें घर जळालें तेथें तुझी जाळें जळाली कसब चालवावयास उपाय नाही याची विल्हे करावी व म्हणून बखैर माहालींहून घेऊन येऊन तुवां अर्ज उतर चीटीविसी केलास यैशीयास तुझे कसब चालोन उपजीविकेस जागा असावा तर नवी जाळे घेऊन कसब चालतें करणे नवीन सजाकरितां तुजला येहसान असावा म्हणून बा।। गुा। महसूल पेरा ७।।= वजा सूट २।।= बाकी ५ पांच करार केले असेत सदरहु प्रा। सरसाल उगवणी करणें पेस्तर साली पेसजी मा। प्रा। न पुरवे तर हुजूर विल्हेस येणें अभय असे छ ९ जालीखल

राजते
लेखनावधि

---

ले. ५८ शके १६६८ ज्येष्ठ वद्य ५, इ. स. १७४६ मे २८

कागदाचा वरचा भाग फाटला आहे.

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य राजश्री रामाजी महादेव नामजाद

---

१ मानाजीचा दुसरा शिक्का व दुसरें मोर्तब

प्रा साष्टी गोसांवी यांसि सेवक बालाजी बाजीराव प्रधान नमस्कार हुजूर येऊन विदित केलें की पाचसले मुंबईकर व वसई साष्टीकर सर्व आमची ज्ञात येक असतां नारायेण नाईक अणजुरकर XXX प्रा साष्टी हे मुंबईकर पाचसले यांस म्हणता(त) की चेऊल रेवदंडेकर पाचसले हे पर आहेत याजसी तुम्ही अन्न-वेव्हार व शरीर समंध करिता म्हणोन त्यावीस दोष ठेऊन कटकट करितात तरी त्यास ताकीद करावी म्हणोन विदित केले त्याजवरून हे पत्र तुम्हांस सादर केले असे तरी तुम्ही नारायेण नाईक व मुंबई व रेवदंडे चेऊल व साष्टी येथील पाचसले याची हकीकत मनास XXX सुदामत पाचसले याचा ज्ञाती वेव्हार चालत आल्या प्रो चालवणे नवीन लटका कजीया करीत असेल त्यास ताकीद करून पूर्ववत प्रो चाल XX जो तुमचे सांगितले नाइकेसा असेल त्याची हकीकत हुजूर लेहून पाठवणे हुजरून त्यास ताकीद केली जाईल ( नि. अ. ) जाणिजे ( नि. अ. ) छ १८ जमादिलोवल ( नि. अ. ) बहुत काये लिहिणे[1]

लेखन
सीमा

---

ले. ५९ } श्री { शके १६६८, ज्येष्ठ व. ५ / इ. स. १७४६ जून २१

श्री
राजा शाहु नरप
ति हर्षनिधानबा
ळाजी बाजीराव
मुख्य प्रधा
·।. ·

दं मा अनाम बालाजी व बालकृष्ण माणकाजी अदिकारी मो चेऊल यांसि बालाजी बाजीराव प्रधान सुा सबा आर्बैन मया व अलफ तुम्हीं आपले वतनी वाडियांवर घर बाधून राहाणार त्यास रेवदंडियाहून उपद्रव न लागे ते करावें म्हणोन तुमच्यांविसी राजश्री रामाजी मल्हार यांणी विनंती केली त्याजवरून हे अभयेपत्र सादर केलें असे तरी तुम्हीं कोणेविसी शंक अदेशा न धरिता आपल्या वतनी वाडियावर घर बाधून सुखरूप राहाणे तुम्हांस सरकारतर्फेची उपद्रव लागणार नाहीं जाणीजे छ १८ जमादिलौवल ( नि. अ. ) आज्ञाप्रमाण

( लेखन
सीमा )

---

१ फुल्या टाकल्या येथें फाटलें. याच मजकुराचें याच तारखेचें नानासाहेब पेशव्याचें पत्र 'शंकराजी केशव' यास लिहिलेलें दुसरी आढळलें. तें छापणें अनवश्यक म्हणून वगळलें.

ले. ६० } श्री { शके १६६८
नकल } { इ. स. १७४६

राजश्री गणेशजी रघुजी गोविंदजी व पाढवजी मदनजी व समस्त मो वसई गो यां

द अंखडित लक्ष्मी आलाकृत राजन्ये श्रेहकित नारायेणजी ना अण-जूरकर सरपाटील प्रा सास्टी तो आटगाव व प्रा साईवन राम राम विनंती उपरि दामुलजी तुकाजी सुतार मुंबैहून चेहुलास जाऊन गोविंद माहादजी सुतार यांसी सोईरीक कली त्यास दामुलजी एकसरांस आले होते ते समई दामुलजींचा सोहरा गोविंदजी चेऊलकर हा तिल्हेरा कुलवीं म्हणौन त्याजवर आरोप कोण्ही आणला त्याबवरून देशामधे व वसैस त्यास अपंगत केले होतें त्याजवरून देशामधी रा बालाजी अदकारी व गोविंदजी व आणीक भले ग्रहस्त चेउलाहून येऊन आपली कुलमालीका विदित केली ते मनास आणितां गोविंदजी यानवर आरोप कोण्ही आणला हे गोस्ट लटकीसी जाहाली तरी तुम्ही पूर्व प्रो यांसी वर्तणूक करणे रा अदिकारी व चेऊल प्रांती आपले श्वयातीचे लोक दोहोचहूं गांवी यांचा शेरी सवंध गाव्हाण तर्फेस होता तो त्यांच्या अना-जार जाणोन सोरिका केलिल्या टाकून दिल्या वर्ज केल्या म्हणौन रा अदकारी यांही विदित केलें तरी याजविसी कोण्हे गोस्टीचा अंदेशा धरावासा नाहीं मागेपुढे गोस्ट कोण्हास करावयासी प्रयोजन नसे याउपरी गोताची उपाहसना कोण्ही करील तो देवाचा गोताचा अन्याई बहुत काये लिहिणे हे विनंती

सेके १६६८ क्षे सवसरे

---

ले. ६१ } श्री { शके १६७३ आश्विन वद्य १२
नकल } { इ. स. १७५१ ऑक्टोबर ५

आज्ञापत्र समस्त राजकार्ये धुरंधर विश्वासनिधि राजश्री मानाजी आंगरे वजारतमाब ता नागोजी आडनाव जोसी कराडा व समस्त कराडे सुहुरसन इसने खमसैन मयां व अलफ कारणे तुम्हास आज्ञापत्र सादर केले असें कीं तुम्ही कराडे आगरी लोकांकडे अन्न वेव्हार करीत आलेत व आगरी यांकडे क्रियेचा जग तुमचा कराडियां चालवीत होता त्यास आगरी याण्ही शंवशये घेऊन कराऱ्हाडियाणे जागक्रिया चालवावयास वर्ज केलें व कऱ्हाडे ताडे भडारीपण करून ताडी काढितात ते आगरीयाने न खावी म्हणून आशंका घेतली त्यावरून ते व तुम्ही हुजूर येऊन हकीकत निवेदन केली मनास आणितां तुम्ही निवेदन केले कीं आम्ही कऱ्हाडाहून कोकणात आलों त्याकरितां कऱ्हाडे म्हणून नाव रूढीस पडिले इतर देसींहून आलो शोध न कळे म्हणौन आगरी आम्हाकडे अन्न वेव्हार करीत नाहीं आम्ही त्यांकडे करित आलों परयत प्राचीन

देसी आम्ही सुध कुलबी होतों सांप्रत आगरी यांही मत करून आमचें हातची माडी न खावी कन्हाडा जाग चालवितो तोही न चालवावा म्हणौन आम्हीही जेवांवयाचा उजूर केला आहे म्हणौन त्यावरून आज्ञा केली असे तुम्ही कन्हाडे आगरी याचा अन्नवेव्हार भोगवटा नाहीं तो नाहींच मनाई केली असे व कन्हाडा आगरी याकडील जाग चालवीत होता तोही मनाई केली असे न चालविणें सरा माडीची अशेंका त्याहीं घेतली ते घ्यावयास प्रयोजन नसे सुखरूप तुम्ही कन्हाडी सरा माडीचा उदीम करणें तो उदीम आगरी लोक खातील म्हणोन आज्ञा केली असे भोगवटीयाप्रो आगरी यांकडे जेवावया तुम्ही उजूर तर प्रांतात व परकी जागा राजपूर प्राती पेण पणवेल प्रांती कराडे असत तेवढे येक करून तुवा आपले जातीमधेच शोध लाऊन मोख्तासर मोख्तासर माहातारे सर्व प्रांतातील कन्हाडे हुजूर येऊन जाती पूर्ववृत्तांत निवेदन करणे तो मनास आणून अंन्न वेव्हाराची आज्ञा केली जाईल सुखरूप राहून आज्ञे प्रो वर्तणुक करणे रा छ २५ रोज माहे जिलकाद

( नि. अक्षर ) सदरहू नकलेचें असल पत्राचें हस्ताक्षेर रा सिवरामजी बावा मुतसदी जंजिरे कुलाबा—

———

ले. ६२ } श्री { शके १६७४ कार्तिक शुद्ध १
तालिक } { इ. स. १७५२ नोव्हें. ६

आज्ञापत्र समत राजकार्य धुरधर विश्वासनिधी राजमान्य राजश्री मानाजी आंगरे वजारतमाब ताहा···माहाद पा॰ बाल पाटेल आंबोजी पाटेल राम पाटेल (पाटे)ल मौजे वाघोली ता॰ श्रीगाव पाल प्रांत चेऊल सु(हुर स)न सलास खमसैन मयां व अलफ तुम्ही हुजूर जजिरे कुलाबेचे मुकामी विनंती केली की आम्ही आपले वडिलापा(सून) मौजे मजकूरची पाटेलकी अनभवीत असतां ग(ण) भगत वस्ती खार शाहापूर हा आम्हासवें कजियास उ(भा) राहिला आहे की मौजे मजकूरची पाटेलकी आपली असे यामुळें द्वंद्वास प्रवर्तोन भुर्तेही आम्हावर घातली (हो)ती त्याची मनसुफी दरबारी येऊन निवडिलीच आहे तथाप आमच्या अनिष्टाचे पैरवीस चुकत नाहीं तरी साहेब कृपाळु होऊन भगत मजकुरास हुजूर (आ)णून न्याये केला पाहिजे म्हणून त्यावरून भगत मजकुरास व जमीदारा व पाटलारे ता॰ मजकूर आणून आणून मनास आणितां तुझेविसीं सरकारांत तकरीर लेहून दिलि कीं पेसजी याचेच न्यायाविसीं हकीकत मनास आणावयास माहाली आज्ञा जाहाली होती ते सम ई) आमच्या साक्षी गुदरल्याच परंतु न्यायास जमा जाहाल्यामधे व यातीत असी नवद वरुशाचे (पुरु)ष आणि याचे गावांसन्निधचे वस्तबादकी म्हणून धर्म नाईक पाटेल मौजे कोमर व आजी तेली याची वस्ती कामारले व धाकुल

पाटेल चौघला स्वार बेली यास उभे करून पुरसीस केली यानंतर त्याही जबानी केली कीं जोम पाटेल याचें लेक सदरहु तिघेजण यासी गण भगत मजकूर कजीया सांगतो परंतु जोम पाटेल याचा बाप माहाद पाटेल परंपरागत पाटेलकी चालवीत असतां आम्ही पाहिला असे याप्रमाणे यांचा त्याचा परस्परें मौजे मजकूरचे पाटेलकी विशाई पूर्वी कजिया पडिला होता म्हणावें तरी तोही नाही व भगत मजकूर दूर परागंदा होता म्हणावें तरी आजी बहुत वरसें स्वार च-हीत होते सांप्रत अलीकडे भगत मजार शाहापुरी आहे असें असोन पूर्वी याचा त्याचा वाद मनसुबी न पडतां जोम पाटेल या···वडिलापासोन भोगवटा करीत करीत आले आहेत म्हणून लेहून दिल्हे व भगत मजकुराचा करीता पुरसीस करितां याचा भोगवटा बहुत तुटला असेल म्हणावें तरी याजवल सनद पत्र कागद असावे तेहीं नाही व भोगवटाही नाही व जमीदार पाटलारे सींव झाडे याचे तकरीरेस दाखल्यास यावा तोही अर्थ नाहीं व याचा तुमचा भुतांविसी कजिया सरकारात येऊन (गु)दरला ते समई तुम्हावर भुते याणी घातली त्याबमुलें गुरांढोरास अपाये जाहाला असे खरे होउन त्याणि आपली भुते म्हणून पदरी घेतली व तुम्ही खर्चाखाली आलेत म्हणून याबकडोन तुम्हास खर्च देविलाच होता व हाली न्याईसमई काहील होऊन खोटा जाहाला सबब त्यास गुण्हेगारी ठरा(ऊ)न तुमची पाटेलकी प्राचीन आहे श्रीमंत कैलासवासी (मो.जा.) आबा सरखेल यांसमईही तुमचा भोगवटा आहे तोच चाहत आहे असें दिसोन···वर तुम्हास भोगवटेयास आज्ञापत्र सा(दर) करून तुम्हास वतन समंध्ये हरखी रुा ६०८ साठ केले असत सदरहु प्रो उगवणी करून पुत्र पौत्रादि वौशपरंपरेने मौजे मजकूरचे पाटे(ल)कीचे वतन अनभवीत जाणे रा छ २९ जिल्हेज[१]

---

| ले. ६३ | श्री | शके १६७७ भाद्र शुा २<br>इ. स. १७५५ सप्टें ८ |
|---|---|---|

राजश्री मुरलीधर व गोपालसेट गिरधर सेट दलाल यासी

श्रीा मानाजी आगरे वजारतमाब रामराम सुा सीत खमसैन मया व अलफ नारायणसेट तुमचे आजे याणी तीर्थरूप कैलासवासी आजोबा व सेखोजी बावासमई बहुतच सरकार कामामुले संकटे वोढोन सेवा केली आम्हास तरी रेवदडियाचे मुकामी तीर्थरूप संभाजी बावाचे समई फारच कामास आले येविसीची पत्रे व सनदा सादर आहेत सेटीचे मागे गिरधरसेटीने अधिकच निष्ठ धरून वर्तत व सेवा व सावकारी करीत आले पालखीचा बहुमान सरका-

---

१ नकल पुष्कळच जुनी; फाटलें तेथें अक्षरें कंसांत संदर्भानें आमची

रातोन[1] चालविला गिरधर सेटीस देव आज्ञा जाहाली त्याचे मागे तुम्हास हे वर्तमान पुत्राचे उर्जितपूर्वक चालवणे आवशक जाणोन गिरधर सेटीचे पालखीचा सरंजाम व तुम्ही उभयता कर्ते समजोन ज्याजती वेतन रुपये ३०० येकूण कदीम ३०० तीनसे मिलोन साहासे अशास मुरलीधर तुम्हांस गिरधरसेटीचे नावे करार केले आणि तुम्ही वडिल सबब रुपये ३५० साडेतीनसे व तुम्हांस व गोपालसेट तुम्हास रुपये २५० आडीचसे केल्याप्रो दर साल उभयथा पालखीचा अनभाव अनमित्रत जाणे सुखरूप राहाणे निष्ठापूर्वक वर्तत जाणे जाणिजे छ १ माहे जिल्हेज[2] मोर्तब असे

---

ले. ६४ } श्री नारायण { शक १६७८ आषाढ शु॥ ७
{ इ. स. १७५६ जुन ४

राजश्री बालकृष्ण अधिकारी व समस्त जमीदार गोसावी या

॥ दं अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य श्नेहानुवर्ती राघो कृष्ण पुराड दतानेक आसीर्वाद उपरि येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लेखन करीत असीले पाहिजे विशेष आमचे आजे राघो कृष्ण याणी पेठ पाखाडीत वाडी खरीद केली त्याचा उपभोग त्यांही पंचवीस वर्षे केला त्या उपरी आमचे तीर्थरूप कृष्णाजी रघुनाथ यांणी आमरण परियंत उपभोग केला त्यामागें पाचसात वर्षे उपभोग आम्हीं केला चेऊलचे आगर राजक्रांतीने उद्वस पडिले आम्हीही रोजगारामुळे देशांतर फिरतां फिरतां हालीं कसबे भडगाव प्रांत खानदेश येथे नांदत असतां वर्तमान कळलें कीं चेऊलचे आगरांस कौल जाला आहे वसते होतात हे जाणोन आमची पेठ पाखाडींत वाडी आहे ते परम गुरुवर्य वेदमूर्ती राजश्री केशवाचार्य आश्वलायन जामदग्नी गोत्री प्रस्तुत वास्तव्य नागांवे यांसी आम्ही दान दिल्ही असे वंशपरंपरेनें त्यांही पुत्रपौत्री उपभोग करावा आमचे वंसीचा कोण्ही येईल त्यास पेठ पाखाडीचे वाडीसीं संबध नाही हे जाणोन गोसावी यानी आचार्य स्वामीचे साध्य करून सरकारचें दानखत करऊन त्याजवर राजद्वारची मुद्रा व समस्त जमीदारांच्या साक्षी व वाडी मजकुरीचे सींवघडे असतील त्यांच्या साक्षी करून देऊन वाडी मामूर होऊन आचार्य स्वामीस उपभोग घडे तें करावयासी उचित असे बहुत लिहिणे न लगे कृपावृधी कीजे मिति शके १६७८ धाता नाम संवत्सरे आषाढ शुध सप्तमीं रविवार शुा सबा खमसैन मयां व अलफ हे विनंती

---

१ तून दिल्हे इतकें लिहून खोडलें.

२ आधुनिक नकलेची नकल

३ केशवलाल मोदी, अलीबाग यांच्या संग्रहांतून.

ले. ६५ } अलिफ {शके १६७८ ज्येष्ठ वा ३
इ. स. १७५६ जुन १५

अजम रिचर्ड बोचर प्रजिदेत गोवरनदोर जनराल
बंदर मुंबई दाम महबतहु

छ रफाअत अवालीपन्हा शाहामत मा आली दस्तगाहा येहतिजाद दोस्तां (मो. जा.) बादज शौक मशहुद आकी आंरफाअतपन्हाकडून अलिकडे मखतुदनामा येऊन खुशवख्ती हासील होत नाही तरी हमेशा खुशनुदी ईरकाम करीत गेले पाहिजे इज्यानेबाकडील मजकूर तरी सावनूरचा मुकदमा फैसल करून तुंगभद्रा किनारा जाऊन बिदरार व सोधे व चित्रदुर्ग हरपन्हळी वगैरे मकानच्या खंडण्या विल्हे लाऊन घेऊन माघारे फिरलो मजल दरमजल मकानास येत असों विजयदुर्ग सरकारच्या सरदाराचे हवाली करावयाचा करार मदार आं शाहामतपन्हानी केला त्याप्रो किला दिल्हाच असेल तरी सरकारीं किला दाखल केल्याची खुशवख्ती तरकीम करून दोस्ती ज्यानबैनची चालत आली आहे ते दिनबदिन तरकी होये ते केले पाहिजे ( नि. अ. ) रा छ ३ रमजान ज्यादा काये लिहिणे हें किताबत

पैवस्तीं इंग्रजीत अस्पष्ट झालेली··· Recd. the 15 (June) 1757

---

ले. ६६ नकल } श्रीरामेश्वर {शके १६७९ आश्वि. शु. ७,
इ. स. १७५७ ऑक्टो. १९

आज्ञापत्र समस्त राजकार्ये धुरंधर विश्वासनिधि राजमान्ये राजश्री मानाजी आंगरें वजारतमाब ताा कारभारी महाल आंगर चेऊल सुहुर सन समान खमसैन मयां व अलफ बदल देणे घर्मादाये नंदादीप श्री (मो. जा. ) वास्तव्ये स्थान महाल मजकूर श्रीचा गुरव बनाम मल्हारी वलद विसाजी भांडविलकर याणी हुजूर कुलाबांचे मुकामी विनंती केली कीं श्रीस प्राचीन सेत जमीन नैवेद्यार्थ मोहीन व नंदादीप चालावयाचा त्याप्रमाणे सरकारांतून चालतच आहे परंतु श्रीची वाडी कदीम श्री आर्पण असोन श्रीकडेस चालत नाहीं वाडीचा महसूल सरकारांत जमा होतो आणि नंदादीपास ईतलाख सरकारातून पावतो ऐशास नंदादीपाकरितां सरकारांतून इतलाख मोहीन प्रमाणे साल दरसाला पावत आहे तो मनाई करून श्रीची वाडी श्रीकडेस करार करून चालविली तर वाडीवील जुनी व नवी लावणी करून नंदादीप सरकारचा चालवावयास उमेदवार आसें वाडीचा महसूल नंदादीपार्थ सरकारांतून घर्मादाये खर्च पडत आहेल वाडीचें उत्पन्नामुळे सहजांतच॰ दीपाचे सरंजामास अनकूल

होऊन मामुरीमुळे शेष राहून पाऊन त्याजमधे आपलेंही उपजीविकेस जागा होईल आपण सिवनिर्माल्याचा विभागीच असें दीपांगत्वें वाडी गुरवाचे स्वाधीन जाहालेयावर दीपाचे नियेतास गुरवापासून अंतर पडिलें तर हा विचार दिसतच आहे त्याजमध्ये अनुमात्र दीपास व्यंग नसावें श्रीचा औश्य श्रीस पाऊन उरल्यामंधीच माझी इच्छा असावी अनेथा आचार घडल्यास व केल्यास इहलोकीं व परलोकीं आपला परिणाम बरा नाहीं येविसींचा आपले चितांतील अभिप्राये सरकारांत सेवेसी निवेदन होऊन श्रीचे नंदादीपाचे यैवजीं श्रीची वाडी म्हणोन गुरवाचे श्वाधीन असावी म्हणून आपला अर्ज आहे म्हणून त्यावरून हेच विषई जमीदार प्रांत मजकूर व माहाल मजकूर यांसी पुरसीस करितां मशारनिले यांही विदित केले कीं गुरव मजकुरानी विदित केलें या गोस्टी येथार्थच आहेत सांप्रत देउलवाडी म्हणोन वाडीचें नांव वोढत आहे प्राचीन रकमालेयास म्हटलें तर नउदर सोनवाडी पाखाडी भोरसी नजिक श्री (मो. जा.) स्थान मलिक अंबरी रकम लाहारी १० दाहा सिलोत्री कृष्णाजी पदाजी खत्री म्हणून रकमालेयास आहे खत्री मजकूर यास वाडी मार असतां त्यास जन्मांतर संचितेकरून सुबुधी संभवोन वाडी श्री अर्पण करून उदक सोडिलें आहे तै पासून श्रीचे गुरवाचे श्वाधीन जाहाली होती याज-प्रमाणे हकीकत आम्हास दखल आहे म्हणून त्यावरून हरदु जबानी हकीकती-वरून तात्पर्यार्थ मानस आणितां श्री आर्पण वाडी पूर्वींच पासून असेल येसा दिसोन आल्यावरून सांप्रतवाडी श्रीमंत(मो.जा.)मातुश्री आईसाहेबांकडेस असतां हे हकीकत संपूर्ण मातुश्रीस कलतांच आज्ञा जाहाली किं पुरातन श्रीची वाडी श्री अंगत्वें गुरवाचे ताबे न जाहाल्याने उपद्यमान नंदादीप लागोन श्री अर्पण होईल वाडीचा महसूल धर्मादाये खर्च पडेल तेणे कहू(न) राजश्री (मो. जा.) स्वामीच्या राज्यास कल्याण असे म्हणून त्यावरून वाडी मजकूर पेड सुमार बरकुम पेढ मोजणी सन सीत खमसैन देखील नवी लावणी देखील

| माड पेढ सुमार | सुपारी सुमार | ताड सुमार | उंडी रोपें सुमार |
|---|---|---|---|
| ४२ बारदार | २ बारदार | ३ बा मखता | २ |
| १० झिटे | २ गैर बारदार | ३ बा पाहाणी | |
| २ रोपे | ५ उमेदवार | — | |
| — | — | ६ | |
| ५४ | ९ | | |

येकूण मक्त पेसजीं हाा सन खमसैन तागाईत सन आर्बा पांच साला पुरल्या-नंतर त्याजप्रमाणेच हाली जमाबंदी चालत आहे सबब पेसजीचा मखता चालत आल्याप्रमाणे आकार देखील बाबती

नकद रुपये
१३।।।= यैन आकार
१२।।। नारळ
१८= पानवेली
१३।।।=
८८।।।· ज्याजती चड
२१।।।=।।।
३८ ताड ६ पो
२४।।।=।।
तपसील
बा। मख्ता बा। पाहाणी
२१।।।=।।। येन सालदरसाल
१।। ताड ३ प्राहणीवर ताड ३
—रुा
२३।=।।।· १।।
काथा [काथल ?] देऊळ सबब माफ
०

नवे लावणीचें पेढ सुपारी व उंडी
मख्ते यांतील लावणीपैकी सबब अला-
हिदा महसूल ०
झांप पेढ सुमार ५२ येकूण खेरीज
रोपे झांप सुमार
१५६ महसुली दर
माडास ३ प्रो
० खरीदी दर २
प्रो हरदु देउल-
वाडी सबब माफु
१५६

येकूण पावणें पंचवीस रुपये पावणेतीन आणे व झांप येकसें छपन हाली आकार व पेस्तर नवे लावणी बारदार होऊन ज्याजती जमाबंदी होईल त्या देखील खेरीज हकदार प्रतवर्षी ताजे संदेशा आक्षेर न करितां साल मजकुरापासून साल दरसाल नंदादीपाचे अैवजीं धर्मादाये खर्च लिहीत जाणे या सनदेची प्रत करून घेऊन असल परतोन भोगवटीयास गुरव मजकुरास देणे रा। छ ५ माहे सफर

---

ले. ६७
नकल

श्री

शके १६७९ कार्तिक शुद्ध १४
इ. इ. १७५७ नोव्हें. २४

( शिका )

दं मा। अनाम जमीदार मामले चेऊल यासि मानाजी आंगरे वजारतमाब सु॥ समान खमसैन मयां व अलफ राजश्री रामा थळ ता। अष्टागर मामले मजकूर याणी जंजिरे कुलाबेयाचे मुकामीं येऊन विनंती केली कीं श्री (मो. जा.) माहास्थान चंपावती देवाळये जीर्ण जाहाले होते त्याचा जीर्णोधार श्री ( मो. जा. ) च्या कृपेकडून जाहाले आहे देवालयाचे सनिध बाग बागाशाई जिरायेत व बागायेत पुस्प

वाटिका कर्तव्य आहे केली त्यास श्री (मो. जा.) च्या पूजा आर्च्यास पुस्पे आधीकरून माहामुरीमुले उत्पन होईल तो अर्थ उपयोगी पडेल हे श्रेयेस्कार आहे कृपालु होऊन जमीन इनाम देविली पाहिजे म्हणून अैशास श्री(मो. जा.) ज्याग्रुत माहास्थान व तेथील देवालये याचा जीर्णोधार मशारनिल्हेनी करून काम बहुत अपुर्वात केले तेथील सर्व प्रकारे उर्जा चालली पाहिजे हे जाणोन कृपाळु होऊन देवालयासनिध दक्षिण व पस्चेमेकडील जमीन बिघे ८७ सात इनाम करार करून दिल्ही आहे बागाईत व जिरायेत फुलझाडे देखील मामुरी करून वांशपरंपरेने भोगवटा करितील सदरहु जमिनीचा आकार होईल तो इनाम खर्च साल दरसाल लिहीत जाणे नूतन पत्राचा आक्षेप न करणे नकल घेऊन असल पत्र भोगवटीयास परतोन देणे (नि. अ.) रा छ ११ माहे रबिलावल (माहर्तब)

---

ले. ६८ } श्रीरामेश्वर { शके १६८० आश्विन शु. १४
इ. स. १७५८ ऑक्टो. १५

राजश्री दुर्गाजी सिंदे सुभेदार जंजिरे रेवदंडा गोसावी यांसि

दं अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य श्रा भिवजी विश्वासराव हवालदार किले मीरगड रामराम विनंती उपरी येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लेखन केलें पा। विशेष किले मारचें नामजाद लोक जंजिरें मारी आहेत त्यांस बारीचे लोक येथून पाठविले आहेत नावानिसीवार—

९ दिा भिवजी विश्वासराव
 ३ विठोजी विश्वासराव
 १ भवानजी विश्वासराव
 १ दादजी भोईर
 १ कान्होजी तुपे
 १ अंबाजी देवघरें
 १ परसोजी पारधी
 १ गोंदजी ठाकूर
 —
 ९

३ दिा खंडोजी फाटक
 १ नावजी फाटक
 १ होनाजी माणकर
 १ घावजी सांडभोर
 —
 ३
 १ परसनाक पीटनाक दिा रायाजी दळवी
 १ गोजनाक चावना दिा धोंडजी मोरे
 २ दिा जिवाजीराव इंदुलकर
 १ येसनाक सितनाक
 १ गवरनाक हीरनाक
 —
 २
१६

येकूण सोळा आसामी पाठविले आहेत याची हाजिरीकडील अडिसेरी शाईसि[र]स्तेयाची सिरस्तेप्रो देत जावें जुने लोक रवाना केले पा आडिसेरी दर आसामीस दरमाहा समेत डाल ८१॥ दीढ मण व मीठ ८८|· येकसर प्रो देत जावें व विठोजी विश्वासराव यास तेल वजन पके दरमाहा ८८॥६ पाऊण सेर छटांक प्रो द्यावें माहे मारची अडिसेरी येथे पंधरवडाची पावली असे सरदारीचें कामकाम रा विठोजी विश्वासराव यांचें हातून घेत गेलें पाहिजे बहुत काये लिहिणे रा छ १२ सफर सु॥ तिसा खमसैन मयां व अलफ हे विनती.

---

ले. ६९ श्री शके १८६१ आश्विन व. २ इ. स. १७५९ ऑक्टोबर ९

श्री ०
शाहुकार्य धुरं
धर्तु कान्होजी तनुज
न्मनाः मुद्रा वजारत
मावस्य मानसिंह
स्य राजीते

दं मा अनाम अधिकारी व देशकुलर्णी मामले चेऊल यांसी राघोजी आंगरे वजारतमाब सु॥ सितैन मयाव अलफ चिरंजीव बयाबाईस सविस्तर लिहिले असे तुम्हास किलेयांत नेऊन आज्ञा करितील त्या प्रो कागद पत्र पायाशुध्य जलदीने देणे म्हणजे रवानगी करितील पूर्वी कैलासवासी तीर्थरूप सातारेयासी गेले होते त्या समई हाच मजकूर अगोधर पडिला होता म्हणोन कागदापत्रानसी बाळाजी महादाजी देश कुलकर्णी यांस समांगमे नेले होते निशा केला होता तोच पसग पडिला आहे तरी चिरंजीवांस लिहिले प्रो कागदपत्र देणे उजूर न करणे यात तुमचेच उर्जित आहे रा छ १७ माहे सफर (मोर्तब सुद)

---

ले. ७० श्री शके १६८२ अ. श्रावण वद्य १२
नक्कल इ. स. १७६० ऑगष्ट ८

आज्ञापत्र समस्त राजकार्ये धुरंधर विश्वासनिधि राजमान्येश्री रावश्री राघोजी आंगरे वजारतमाब ता कारभारी मा चेऊल ता अष्टागर प्रांत मजकूर सु॥ इहिदे सितैन मयां व अलफ कृष्णाजी अदकारी प्रा मजकूर याही हुजूर जंजिरे कुलाबाचे मुकामी येऊन विनंती केली की कैलासवासी आबासाईबी श्री स्थान येथील जीर्णोधार करून नैवेद्य व दीपोत चालती करून ठाई ठाई नंदादीप आदी करून चालतें केले त्या पुण्येमहिमें करून पर्जन्य सुवृध्दी होऊन प्रतवर्षी सुभीकाचाही प्रवाह चालला अैशा गोष्टी होणें हे पुण्ये प्रतापावांचून नाहींच चेऊल चंपावती पूर्वील पुराणप्रसीध शाहार तीनसें

साठ देवालेयेंच होतीं व त्याचा सध्या अद्याप आहेचं भंगल्याचा जीर्णोधारा-चाही प्रवाह चाललालाचं जेंथील जीर्णोधार जाला तेथें सरकारांतोन नैवेद्य व दीपोत चालतींही जालींच आहे परतु श्रीनारायेण आदिस्थांन असोनं सरकारांतोन घर्मादाये चालत नाहीं यास कारण म्हटले आम्ही जमीदार येऊन सरकारांत बजीदच्च जालो नाहीं त्याच मुलेंच आज पावेतों सरकारांतोंन मोईन मुकरर जाला नाहीं शब्द जमीदाराचेकडे येईल साहेब कृपालु होऊन साल-मजकुरापासून दरसाल नैवद्या व दीपोतीचा करार करून सनद सादर करणार साहेब धनी मायेबाप आहेत म्हणून त्यावरून श्रीस घर्मादाये चालल्याने श्रीमंत स्वामीच्या राज्यास श्रेयस्कर जाणून सालमजकुरापासून दरसाल करार बेरीज नैवेद्यास व श्रीचे पुजेस दीपोतीस तेल दरसाल वजन ८८|· ब्राह्मण असतो त्या देखील पावसेर प्रा॥ सालीना एकूण नख्त सालीना भात ·|||· चाखे उसने मापे रुपये ५||= येकून भात उसने मापे पधरा मण व नख्त साडेपांच रुपये चवळ करार करून आज्ञापत्र सादर केलें असे तरी प्रतवार्षिक साल मारा पासून चालवणे दर दरसाल ताजे सनंदेचा उजूर न घरितां सुभे मार खर्च लिहीत जाणें रा छ २६ माहे जिल्हेज.

---

| ले. ७१ नकल | श्री रामेश्वर | शके १६८२ मार्ग वद्य १२ इ. स. १७६१ जानेवारी २ |
|---|---|---|

राजश्री काकाजी रायाजी व धोंडो गणेश मो॥ चेऊल यासि सु॥ इहिदे सितैन मया व अलफ विनंती पत्र हुजुरून आज्ञापत्र सादर जाइल्यावरून श्री (मो. जा.)चे दीपाची हकीकत गोंदजी राऊत याचे व धुशा लव्हार याचे कजियावरून लिहिलेत की सरकारच्या दीप लाविल्यावर प्रथम ज्याची दीपमाल बाधिली असे त्याणी त्या मागोन ज्याची असेल त्याण्ही लावावा येसे चालत आहे त्यास गोदजी राऊत याणी दीपमाल सेणव्यापैकी पुरातन आहे तिजवर राऊत माराचे वडिलापासून दीप लावीत आले मागोन लोहाराचा लागतो येसे आहे म्हणोन लिहिलेत त्यास पुरातन चालत आलेप्रा॥ दीप लाववणे आवीक आगले जो करील त्यास हुजूर पाठवणे राऊत मजकुराचा दीप अगो-धर लावितात मागोन लोहार लावितो म्हणोन लिहिलेच आहे वतनदार अद-कारी पाटेल ग्रामस्तायाचे विद्यमाने लेहून पाठविलत तर लिहिल्याप्रा॥च हर-दुजणास वर्तवणे जो नवी करील त्यास हुजूर पाठवणे रा छ २४ माहे जमादिलावल[१]

---

१ (याच कागदाच्या दुसऱ्या नकलेंत बाजूस "परवाना रा॥ राघोजी आगरे जजीरे कुलाबा" असा जास्त मजकूर.)

ले. ७२ } श्री { शके १६८३ ज्येष्ठ वद्य ५
इ. स. १७६१ जून २२

श्री ०
शाहुकार्य धुरं
धर्तु कान्होजी तनुज
जन्मना मुद्रा वजारत
माबस्य मानसिहस्य
स्य राजीते

ई मो अदकारी प्रात चेऊळ यासि राघोजी आंगरे वजारतमाब सुा इसने सितैन मया व अलफ राजश्री रामजी मल्हार याही दादाजी तावजी व लाडकी अयाल बाळाजी माहादाजी देशकुलकर्णी याणी ताो (बा)म्हणगाव ताो उमटे येथील देशकुलकर्णाचे वतन रास्ती किमत घेऊन फरोख्त करून दिल्हे हुजूर आणून खत मारनिलेनी रूजू केले आणि तुम्हा जमीदाराच्या शाहिदा असाव्या म्हणोन विनंती केली त्यावरून हे पत्र सादर केले असे शाहिदी करणे (नि. अ.) रा छ १८ जिलकाद (मोर्तब सुद)

---

ले. ७३
नकल. } श्री { शके १६८४ श्रावण वद्य ५
इ. स. १७६२ आगस्ट १०

मशहुरुल—

रघूजी ठाकूर१ शाम ठाकूर१ कृष्णांजी ठाकूर१ नारोजी (ठाकू)र१ बिन भीव ठाकूर सेकीन कसबे खांडाळे ताो मजकूर मामले मुर्तजाबा(द) उर्फ चेऊल यासी कृष्णांजी माणकाजी व विठोजी आपाजी अधिकारी मामले मजकूर सुा सलास सितेन मयां व अलफ कसबे खांडाळे येथील पाटेलकी बेवारिसी जाणून कैलासवासी राजश्री (मो. जा.) सरखेल साहेब जंजिरे कुलाबा येही सरकारी अनामत ठेविली ते पाटेलकीची आस्ता धरोन तुमचा बाप भीव ठाकूर कैलासवासी (मो. जा.) सरखेल साहेबाचे अमलापासून व राजश्री (मो. जा.) सेकोजीबाबा सरखेल व राजश्री (मो. जा.) मानाजी आंगरे वजारतमाब ऐसी परंपरागत सेवाचाकरी करोन श्वामीच्या राज्यास अभिष्ट इछून गांव निसबतकारभार व आल्या गेल्याची बरदास्त बिनमुशारा आजपर्यंत करीत असा त्यास कसबे खाडाळें राजश्री (मो.जा.) वजारतमाब येही राजश्री राघोजी आंगरे आपले चिरंजीवास गांव देखील पाटेलकी मोकासा इनाम दीधला त्याजवर तेथील पाटेलकी होणे हे निरुपाये जाणून हालीं श्रीमंत राजश्री (मो. जा.) राघोजी आंगरे वजारतमाब जंजिरे कुलाबाचे मुकामीं तुम्ही जाऊन सेवेसी विनंती केली ऐसीजे आमचे वडील परंपरागत आम्हीं राजश्री स्वामीच्या राज्यात सेतवाडी व सेवाचाकरी करीत आलो व पुढेही करावयास उमेदवार असो तर आम्हावर कृपाळु होऊन आमचे कुटुंबास रक्षणार्थ अन्नवस्त्रास जागा करून देणार साहेब धनी मायेबाप आहेत म्हणून अर्ज केला त्यावरून तुम्हीं

विदित केले विनंतीवरून तुमचे निस्ठेवर नजर देऊन तुमचे कुटुंबाचा योग-क्षेम चालावयास मौजे कालोसी तो खाडाले मामले मजकूर येथील पाटेलकीचे वतन निवारीस जाणून तुम्हास करार करून वतनसमधे हरखी रुपये ४०८ च्यालीस सरकारी घेऊन छ १९ रोज माहे मोहरम सन मजकुरी तुम्हास सनद दीधली ते सनद आम्हानजीक आणुंन रुजू केली आण त्या पत्राची नकल आम्हा ववल देऊन पेस्तर आम्हा जमीदाराचा दाखला दस्त येवज असावा म्हणून विनंती केली त्यावरून तुमचे वडीलापासून ममता जाणून तुम्हास आपले हस्ताक्षरे पत्र लेहून दिल्हे त्यास दिवाणचे संदेमोजीब वौश परंपरंपरेने पुत्र पोत्री पाटेलकीचे वतन अनभवोन पानमान हक्क मुशाहिरा सिरिस्ते प्रमाणें घेत जाणे बाणिजे छ १९ मोहरम

---

ले. ७४ } श्री रामेस्वर { शके १६८४ माघ शु. १२ / इ. स. १७६३ जाने. २६

श्री ०
शाहु कार्य धुर
घर्तु कान्होजी तनुज
न्मना मुद्रा वजारत
मावस्य मानसिंह
स्य राजीते

दं मांा कृष्णाजी अदकारी माा चेऊळ यासि राघोजी आगरे वजारतमाब सुाा सलास सितैन मया व अल्फ श्री (मो.जा.) ची यात्रा माघ वद्य सिवरात्रीची सालाबाज प्रों भरावयास असावी त्यास चेऊळ प्रातातील रयेत सावकार व मुंबई व साष्टी वसई कल्याण भिवडी प्रात व राजपूर प्रातांतील व वरघाटचे सावकार व यात्रेकरून येऊन यात्रा सरकार येकतर्फात भरेल त्याची रखवाली सरकारतर्फेने स्वारी जाऊन होत आल्याप्रमाणे व्हावी ते होईलच असे असता राजश्री आनंदराव सिंदे रेवदडियातोन स्वारी पाठऊन चौकी ठेऊन वलवटा पाडणार त्यास या मागचा दाखला म्हणतील तर शामलाचा दंगा होता यामुळे व उदेरीस मोर्चेबंदी होती म्हणोन मेहेमान दाखल जुजवी लोक यात्रेत येऊन रखवाली जाली तोच दाखला म्हणोन म्हणतील तर शोभेत पडणार नाही व वलवटीयात येता न ये येक तर्फा प्रातात आमल मामला रखवाली खबरदारी होणे करणे ती सरकारतर्फेनेच केली जाईल तुम्हास करावयास प्रयोजन नसे येसे गुरवासमागमे सागोन पाठविले असतां त्याकडील आशये की रेवदडकर सावकार रयेत यात्रेस जाईल त्यांची रखवाली आम्हास करावी लागते लोक पाठऊन यात्रा आहे तो करून येसें गुरवाकडून कलोन आले त्यास ही गोष्ट सरकारात उपेगी पडत नाही रेव-दंडियातील सावकार व रयेत लोक येतात त्या प्रो आजे जागाचे येतात तेव्हा त्याकडील रखवालीस लोक स्वारी यावे हे गोष्ट चालत आले असात शोभेत पडत नाही जे रखवाली खबरदारी करणे ती सरकार तर्फेने होईल येसे पष्ट

तुम्ही जाऊन त्यास कलऊन जावस्वाल उगऊन येणे लटके गोष्टीत जीव नसे यैसे असोन करू म्हणतील तर यात्रा पडेल वरकड रेवदडकर सावकारास व रयेत चाकरमाने यांस इकडून मनाई नाही व होणार नसे त्यास संशये असला तर रेवदडकरास मनाई करावी इकडून जसे पष्ट जाऊन कलवणे जावज्वाल करारात येईल तो येऊन सांगणे छ ११ रजबु

(मोर्तब सुद)

---

ले. ७५ } श्रीगज्यानन { शके १८६९ ज्येष्ठ
नकल } { इ. स. १७६७ मे नंतर

राजश्री राघोजी आमरे वजारतमाब सरखेल गोसावी यासी

ई सकल गुणालंकरण अखडित लक्ष्मी आलंकृत राजमान्ये ( मो. वा. ) श्रो मोराजी सिंदे मो जजिरे रेवदंडा रामराम विनंति येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लेखन करीत असीले पाहिजे विशेष पत्र पाटविले ते पावले चेऊलकर व रेवदडकर व थेरवडकर कोली बाहेर दर्यात कवीची कुटे आऊन मासली मारीत आले असता गुदस्तापासोन रेवदडकर कमला पाटेल हरकत करून चेऊलकरास मेड आऊ देत नाही रेवदडकर व थेरवडकर कोली यानी मासली मारून पोट भरावे चउलकरानी सुदामती जागियावर कुटे गाडु नये मासली मारू नये पोट भरू नये हितका अतिशेये कमल पा। मा।र बेहनसाफे करितो रेवदडकर श्रीमताचे सरकारचे आणि चेउलकर गरीबाचे पोटाचे उदीमाची दाद सुदामतपासोन घ्यावी म्हणून विस्तारे लिहिले ते कलले अैशास चेउलकर कोली येथे येऊन वर्तमान सागितले त्यावरून रेवदडकर व थेरवडकर यास आणून वर्तमान पुसिले याचे त्यासे रुबेरुव वर्तमान मनास आणिता चेउलकर कोली यानी सुदामत जागा सोडून दुसरे जागां कुटे आविली त्यावरून त्याचा याचा कजिया पडला होता त्यास चेउलकरांस सागि(तले) की दुसरे जागा खुटे तुम्ही आविली आहेत तिकडून सुदामत जागा आविता येथे आवांवी आपणही त्यांस ताकीद करावी की सुदामत सालोसाल आविता तेथे आवावी नाहाक कजिया करू नये येथेही कमल पाटेल यासी ताकीद केली आहे. सुदायतीस नवदिगर होणार नाहीं कलावे रा। छ १७ माहे समाविलाखर बहुत काये लिहिणे लोभ करावा हे विनंती

[ निराळ्या अक्षरांत जागा सोडून* ]

असल पत्र हुजूर जंजिरे कुलाबा दफतरी आहे त्या पत्राची नकल सुहुर सन समान सितैन मयां व अलफ सेके १६८९ सर्वजितनाम संवत्सरें हे पत्राची नकल लखम पाटेल सरपाटेल जजरे कुलाबा यांनजिक आहे.

---

ले. ७६ } श्री { शके १६८९ पौष शु. १२,
इ. स. १७६८ जाने. १

श्री
शाह कार्य धुरं
धर्तु कान्होजी तनुज
न्मना मुद्रा वजारतमा
बस्य मानसिंह
स्य राजीते

अभयपत्र समस्त राजकार्य धुरंधर विश्वासनिधि राजमान्य राजश्री राघोजी आंगरे वजारतमाब सरखल बनाम अजम सेराजुदीनखान सिलोत्री खार खानपूर कसबे चेऊल मामलें मुर्तजाबाद उर्फ चेऊल सुहुर सन समान सितैन मयां व अलफ दिल्हें अभयपत्र ऐसे जे हुजुर जंजिरे कुलाबाचे मुकामी विनती केली कीं खार मार आपलें सिलोतर असतां अलिकडस बहुत दिवस दर्या गर्क होतें त्याची नौबदिस्त सन आर्बांत केली खाड्या मोडल्या उपरात उधाण होऊन खाड्याच गेल्या तेव्हा काटा जुबवारा होहून तमाम धुपोन गेला साहुकारी पैसा आगावर पडला तेपासून स्वारी खाली फारच आलों त्यात तकवा धरून साल मजकुरीं फिरोन नौबदिस्त केली त्यात कुलभरणा असल्याविना पुढील मामुरी होणार नाही याजकरितां परमुलकी कुलें आणिली पाहिजेत ती खार मारी यावयास सरकारचा कौल नियेत सुधा असावा म्हणून त्यावरून मामुरीवर नजर देऊन परमुलकी कुले येतील त्यास वगैरा करार

परमुलकीं कुळे येऊन टिपेस घर लागल्या सालापासून घर देणे खो॥ तहकु(ब) अजीपाल सालें
३ बा॥ सिरस्ता कौली
१ जाजती रयात दाखल
—
४
येकूण चार सालें अजीपाल उपरात दोन सालें निमे देणे तदनंतर भर देणे जमा होईल व वेठबेगार बा॥ सिरस्ता सालें ७ व जाजती १ येकूण आठ सालें अजीपाल या उपर सिरस्ते प्रो॥ पडत जाईल १

खारीस पाटेल भोपी व मढवी व चौगला यास वेठ बिलकुल अजीपाल घर देणे पैकीं मुदामत सिरस्ते प्रो॥ दर आसामीस पाल अगत्वे रु॥ ॥= दाहा आणे अजीपाल पडून दीड रुपया सरकारात जमा होत जाईल १

खुदचा खानाचा खार मारी सेख इसमाईल अडसेरी मुशारे याचा घर बांधोन राहील त्याचे घर टिपेस लागल्यावर घर देणे मात्र अजीपाल दरसाल पडत जाईल कलम येक १

(नि. अ.) येणे प्रो करार करून अभयपत्र सादर केले असे तर परमुलकी कुले खार मारी आणून वसाहत करवणे अभय असे (नि. अ.) छ १० माहे साबान (मोर्तब सुद)

---

ले. ७७ } श्री { शके १६९१ भाद्र. व. १२ ; इ. स. १७६९ सप्टें. २६

चिरंजीव सौ बयाबाई मो जंजिरे कुलाबा यांसि राघोजी आंगरे वजारतमाब सरखेल मो पुणें आसीर्वाद उपरि राजश्री मोरो माहादेव याचे घरींची चाल कार्य प्रयोजन जाहाल्यास कुलगुरूने चालवावें आणि उत्पन्न घ्यावे त्यास अनकूल न पड तरी ब्राम्हण पाठवितात ब्राम्हणही न आला तरी मारनिले ज्या ब्राम्हणास बोलावितात तो चालऊन उत्पन्न नेतो ग्राम उपाध्यास संमंध नाही याप्रमाणे आहे व खार नऱ्ही येथे च्यालीस पंचेतालीस वर्षे वस्ती आहे तेथेंही याप्रोच चालत आलें असतां सालमारीं खार मारचा ग्राम-उपाध्या गोवर्धन जोसी कज्या करितो म्हणोन मारनिलेनी विदित केले त्याबवरून हें पत्र तुम्हास सादर केले असे तरी च्यालीस पंचेतालीस वर्षे खार मारी चाल चालत आल्याप्रो चालावें नवीन करावयास प्रयोजन नाही म्हणोन ग्रामउपाध्यास ताकीदपत्र देणें जाणिजे छ २५ माहे जमादिलोवल सुा सबैन मया व अलफ वहुत काये लिहिणे हे आसीर्वाद (मोर्तब सुद)

---

ले. ७८ } { शके १६९१ मार्ग. शु॥ १० ; इ. स. १७६९ डिसेंबर. ८

(पत्राचा आदि अंत फाटून नष्ट)

प्रती बाजी गणेश गोखले मुा किले माणगड प्रां राजपुरी कृतानेक साष्टांग नमस्कार विनति उपरी येथील कुशल जाणून स्वकीये कुशेल ताा मार्गसर शुधे १० दसमी पावेतो किले मजकूरचे व आमचे वर्तमान येथस्तीत आसे श्रीमत काका तलेयाहून स्वारीसुधा किले मतगडास गेले होत तेथे चार रोज परयेत राहून राा मदनाजी नाईक घोसालगडकरी सरदार याचे लोकाही व किलेकरी लोक सुधा हजेरी घेऊन असामी सुधा लोक ७०० पावे रोजमुरे देऊन लोकाची समजी पाडोन अजम सेख आली हवालदार याचें लोकाची हजरी घेऊन किले मजकुरी नामजाद ठेऊन बदस्तोबत करून येणार होते इकतियात जजिरेकरास बातमी लागली स्वारीसुधा काका तल्यास जाणार आहेत त्याणे खसा स्वारीस राा बाबूराव घाटगे यासी वस्त्रे देऊन लोक खसे

सरदार आजम आवदलाखान खास पतकी याजबरोबर लोक सिपाई गाडदी १००० हजार पावतो रवाणगी करून किले तले याचे मोकामी जावे या प्रा करार करून लोकास रोजमुरे देऊन गलबते बरोबर देऊन म्हसले बदरी उतोन्हून मारगिरी करू लागले इकतियात वातमी किले मजगडास कललिया- वर स्वारी सुधा कृष्णाजी नाईक याणी लढाई मातबर जाहाली याजवर (जं)जिरेकराचे लोक जखमी आसामी १० व ठार आसामी ४ येकून आसा चहु आले होऊन तलकरी याणी आपली (अपूर्ण)

---

ले. ७९ } श्री { शके १६९२, मार्ग. व. ६ पूर्वी
१७७० डिसें. ८ चे पूर्वी थोडे दिवस

श्रीमंत (मो. जा.) वजारतमाब सरखेल साहेबांचे सेवेसी आज्ञाधारक माहादजी बलाल देसाई व देशकुलकर्णी मामले चेऊल व अदीकारी तो अष्टागर व तो झिराड मामले मजकूर साहेबाचे सेवेसी विज्ञापना यैसीजे मातुश्री (मो.जा.) बाईने निमे वतनाचे पत्र पूर्वी साहेबांचे सेवेसी लेहून दिल्हे आहे तें त्याप्रमाणे करारच आहे मातुश्रीचे पोटीं संतान नव्हतें म्हणोनं मातोश्रीने साहेबांचे सेवेसी विनंती केली कीं वतनदाराची वंशवृद्धी चाली पाहिजे तर साहेब कृपाळु होऊन दतपुत्र घ्यावयाची आज्ञा करावी त्याजवरून साहेब कृपाळु होऊन दतविधान करून मजला मातुश्रीच्या पदरीं घातलें त्यास पूर्वी मातुश्रीनें साहेबाचें सेवेसी पत्र लेहून दिल्हे आहे तें करार आहे त्या अन्वयें आज्ञेप्रमाणे वर्तणुक करीन सेवेसी श्रुत होये हे विज्ञापना

त्यास खासा स्वारी हेट प्रांती हैदर नाइकावर होणार म्हणोन राजश्री भावजी जना(ज)र्दन व विटल सुंदर यांस मातुश्रीस बालवावयास पाठविले त्यास मातुश्रीचा पाय कापला तेणेकरोन हलाख आहेत म्हणोन यावयास अनकूल पडत नाही तरी पूर्वी मातुश्रीने साहेबांचे सेवेसी पत्र लेहून दिल्हे आहे त्याच्याच अन्वयें खासा स्वारी स्वस्थलास आल्यानंतर फरोक्त खत लेहून देऊ सेवेसी श्रुत होये हे विज्ञापना.

---

ले. ८० } श्री { शके १६९३, आश्विन शुा १
इ. स. १७७१ ऑक्टोबर ९

साहेबाचें सेवेसी आज्ञाधारक अधीकारी प्रांत चेऊल कृतानेक रामराम विज्ञापना रा बच्याजीपंत येहीं आम्हास पत्र पाठविलें ऐसें जे तुमचे भेटीचें प्रयोज(न) आहे तर रेवदंडेयास येणे त्याजवर आम्ही गेलो नाही दुसरे दिवसी

राजश्री अनंदराव सींदे सुभेदार येही मनुश पाठऊंन बोलावून नेलें बाहेरचे सदरेस मडलीसमेत बैसले होते त्याजवर आम्हास आज्ञा केली कीं देशमुखाचा हक कानु कायदा रेवदडेंयास काये कैसा आहे तो सांगोन द्यावा त्याचें उतर केलें की चेऊळ प्रांत समग्र आमचे येजमान साहेबांचे तालुक आहे तेथील देशमुखीचा अमल अनभवास राजश्री विस्णुपंत आले आहेत त्यास येजमान साहेबांकडून पटाभिशक वतनाचा होऊन वस्त्रे देऊनं जमीदारीचा अमल तिवां जमीदारांचा करार होऊन येईल पेस्तर जो पाया असेल त्या प्रमाणे अमल चालवावयाची आज्ञा हुजरून होईल ते समईं आज्ञाप्रमाणे जमीदारांची कानुकैद जे दखल असेल ते सांगितली जाईल तावत्काल कानु काइदा जमीदारांचा याचें भाशण कोण्हे येकाजवल करवत नाहिं आमर्या(दा) करून भाशण केलियाने हाकीम लोकांचा विश्वास नाहीं अपायास अंतर होणार[1] नाहीं हें भाशण आईकोन सर्वाहीं प्रमाणात आणु(न) रजा दिली सदरहु वर्तमान सेवेसी श्रुत होणे रा। बच्याजीपंतांचे पत्र आम्हास आलें होते ते सेवेसी पाठविलें श्रुत होणे हे विज्ञाप्ति सदरहु वर्तमान माहाली येऊन श्रुत केले हे विज्ञाप्ति

---

ले. ८१ } श्री { शके १६९५ श्रावण वा। १० / इ. स. १७७३ आगस्ट १३

श्री ०
राजाराम नृप
चरणी सादर मान
सिंहसुत राघोजी व
जारतमाब सरखे
ल निरंतर

अभयपत्र समस्त राजकार्ये धुरंधर विश्वासनिधि राजमान्य राजश्री राघोजी आंगरे वजारत माब सरखेल बनाम सिवराम पाडुरंग जदीद वाडकर भाट जमीन माहाल थळ ता। अष्टागर उर्फ सुभा प्रा। चेऊल सुहूर सन आर्बा सबैन मया व अलफ दिल्हे अभयपत्र ऐसें जे शके १६९५ विजयनाम सवत्सरीं हुजूर जंजिरे कुलाबाचे मुकामीं येऊन विनती केली कीं आपले बाप पाडुरग रघुजी वर्तमान असतां माहाल मजकुरीं भाट जमीन पाहून प्रांतात बागायेतास कौल येहेसान होऊन कौल जाके म्हणून भाट जमीनीवर मेढा घालून लावणें बागायती केलें कौल घ्यावा तो ते समईं घेतला नाहीं कृपाळू होऊन नवे लावण्याचा सिरस्ता प्रांत मजकुरीं आहे त्याप्रा। कौल सादर कर-

---

१ 'होणार' हा शब्द ओळीवर तत्कालींच लिहिलेला.

णार साहेब धनी आहेत त्यावरून मनास आणिता मेढा सन इसने सितैनात घातला ते समई झाड वगैरा लावणें केलें त्यावरून सन इसने पासून रुसवणी सालें ३ तीन आगराचे सिरस्तेप्रा वला देऊन उगवणीस ह्या सन खमस सितैन ता सन समानीन साले १६ सोळा होऊन सतरावें साल सन इहिदे समानीन ते सालीं वाडीची पाहाणी होऊन नवे लावणें याचे सिरस्तेप्रा कौल साल दरसाल येणेप्रा करार सरकारातून घ्यावयाचा सिरस्ता यावत् जमीन तावत्काल

झाड पेद बारदार ज्या झाडावर नारल १० दाहा आले असतील तो बारदार धरून बारदार पेढास देखील बाबती रुपये ।· येकून च्यार आणे प्रा उगवणी होत जाईल करार कलम १

पानवेली वाडीत केलीयास दरसदे खो बाबती रुा ।।· येकून निम रुपया करार कलम १

खा जिनस काथा झाप वगैरा बिलकुल अजी माफ करार कलम १

वाडीपैकी झाड भंडारीयास दिल्हे तरी दरझाडास रुा ।।· निम रुपया सरकारांत उगवणी होत जाईल कलम १

झाप बारदार पेढास मात्र दर २ दोन प्रा सुटे द्यावे त्याबा (!) वर्ताला अजी माफ करार कलम १

वाडीत हरयेक मेवे जात जिनस केलीयास सरकारातून उपसर्ग लागणार नाही वाडीकरानी असंतोसे सरकारात आणि त्यानंतर आणावा करार कलम १

वाडीपैकी हर जिनस नारल पानें वगैरा विकावयास मार्गी जातां व बाजारांत जकात वानगी माफ करार कलम १

पानवेली वाडीत केलियास रतीबा व उाहज फर्मास माफ करार कलम १

सुपारी बारदार पेढास देखील बाबती रु ८= येकूण दोन आणे प्रा उगवणी होत जाईल करार कलम १

झाडदस्त बारदार होईल त्यास देखील बाबती रुपये ।·।।। येकून पावणें पाच आणे करार केले असेत सदरहु प्रा उगवणी होत जाईल करार कलम १

माडाखालीं दरयेक जिणजित्र उसताग-ही केल्यास देणे पडणार नाही माडा खा भाट जमिनीवर केलियास देणें सुटणार नाहीं करार कलम १

वाडीचे मामुरीस परमुलकी माली अगर चाकर ठेविल्यास करार

१ चाकर मुा परके ठेविल्यास जे सालीं टिपेस लागेल त्यासाला- पासून घर देणें व तबाखु ! साले ६ सा सासालें अजीपाल पेस्तर हर(हु) निमेप्रा दरसाल उगवणीं होईल

१ माली ठेविल्यास जे सालीं घर टिपेस लागेल त्या सालापासून ३ तीन साले घर देणें नखु (!) अजीपाळ उप रांत चौथे सालापासून सिरस्तेप्रा व वेठ इस्रावा पुरे तो अजी माफ उपरांत गांवी वेढी दरमहा २ प्रां करीत जाव्या

२ देणे प्रा करार कलम १

येकूण बारा कलमे करार करून कौल सादर केला असे सदरहु प्रा उगवणी करून वाडीची मामुरी सुखरूप करणें अभय असे (नि. अ.) जाणिजे (नि. अ.) छ २३ माहे जमादिलौवल[1] (मोर्तबसुद)

---

ले. ८२ | श्री | शके १६९५ श्रावण वद्य ११
इ. स. १७७३ आगस्ट १४

राजश्री कृष्णाजी माणकाजी अदकारी यास सु॥ आर्बा सबैन मया व अलफ खासा स्वारी रविवारी मुकाम पोईनाड सोमवारी मुकाम नागोठाणेयास होईल तर तुम्हीं निघोन नागोंटणेयास येणे रा छ २४ जौवल मोर्तब सुद

---

ले. ८३ | श्री | शके १६९७ वैशाख
इ. स. १७७५ मे २२ नंतर

राजश्री विठोजी अधिकारी प्रो चेऊल गोसावी यांसि

ई अखडित लक्षुमी आलंकृत राजमान्य (मो.जा.) श्रो मोरो भिकाजी राम-राम विनंती उपरि येथील कुशल (जाणू)न स्वकीये कुशल लेखन करीत असीले पाहिजे विशेष आपण पत्र पाठविले ते पावले राजश्री कृष्णाजी अदीकारी यास देव आज्ञा जाली हे यैकोन चितास बहुत श्रम जाले बर असो मृत्यु लोकीची वस्तीं तेथे उपाये नाही आपण वडील आहेत सर्वांचा परामर्ष करीत जावे आम्हीं आपले आहो ममतेस अंतर न करीत जावे कलकीचे कोंबाचे आटगे थोडे लोणच्याकरिता पाठविले आहे मागाहून दुसरेही रवाना करून बहुत काये लिहिणे कृपा करीत जावे हे विनंती

बा राजश्री दादजी अदीकारी यासि राम राम विनंती उपरि सदैव पत्री संतोषवीत जावे राजश्री विठाजी बावास लिा आहे त्याजवरून कलो येईल योडकेसे कोंब पाठविले आहेत राजश्री आपाजी भगत यांस पत्र लिा आहे त्यास तुम्ही त्याचे घरी जाऊन त्यास रवाना करावे बहुत काये लिहिणे हे विनती

राम राम विनंती[2]

---

१. कागदास ३ जोड. जोडांवर मोर्तब सुद. (केशवलाल मोदी यांचे-कडील कागद).

२ हीं अक्षरें वाजुस, निराळ्या हस्ताक्षरांत व शाईत.

ले. ८४ | | शके १६९८ आश्विन
इ. स. १७७६ ऑक्टोबर

[ पहिला कागद नष्ट. कागद २ रा. ]

मनास आणितां येसाची बाप याच्या इतल्यात चिरंजीव नाहीत व मागील देणे म्हणोन येसाजी बाबाचे बोलणे याबकरिता *मारनिव्हेचे देण्यास अैवज लाऊन द्यावयाची आज्ञा जाहाली पाहिजे १

पाद्री फेल पाद्र खैरात माजरदेव यास त्याचे देणे रुपये ३२५ पाद्री मार याजकडेस मौज कोरला गाव खोती होता ते समईची बाकी त्यास पाद्री याचे येथे कोण्ही नाही खैरात देवीस येवि( सी )...आज्ञा—

कलम १

सावकारी देणेयापौ जिनस व गला कोठीकडेस आनामत होता त्याचा फडशा करून देविला बाकी येणे रु

८९५ सन सबा सबैनात तोतयाचे वेढ्यासमई घेतले त्याजपौ हाली देणे आहे आना—? पोत्यास पुतलाजी रेडा खत्री याजबाबद आहेत ते सन सीत सबैन पौ चोरी बा

४०५ सन इहिदे समानीन विा बाबूराव हरि दातार

१३००

( स ) दरहूचा मबकूर

३७५ सन इहिदे विा दातार पौ मारनिव्हेकडेस नवाद जकाती-बाबद बाकी येणे ९२५ त्यास

३५० त्रिबक वासुदेव याजपासून वेढा उठल्यावर घेतले त्यास चौकसी करिता कोलटकर याचा काही समंध लागतो परंतु कर्ज जमा आहे

२२५ लाखी रंगाबाबद.

२२०० जयरामपंत सोमण याजकडेस सन इसने जकाती पौ बाकी येणे रुपये २२०० पौ त्याचा तपसील—

१२०० कारकुनी बा देणे कृष्णाजी नारायेण फडणीस बा पत्र स्वामीचे

३७५ कारकुनी बा मामलेदार याही घेतले गुा बाबूराव दादाजी

६२५ येन बाकी त्यास तोड्याबा फडशा होणे असे

२२००

सदरहूप्रो सोमण याचे कारकून हिशेब दाखवितात सोमण पुण्यास आहेत तेथे फडशा व्हावा कलम

३२०३ जामदारखान्यांत येवज आहे

१ पैदास्ती डंगीबाबद वगैरे कापड आजमासे रुा १२००

१ हातेरे पौ आजमासे २००

१ हास्तीदंत पौ २०० आजमासे

१ तोतयाचे वेढ्यासमई बक्षिसा-बाबद कडी राहिली त्याचे कारण समजण्यात येत नाहीत

मारनिल्हेचे कारभारी बाबाजी त्रिंबक याचे बोलणे पुण्यास दातार यास लेहून तोस्याबाबद बाकीचा व कर्ज येणे त्याचा फडशा करू म्हणोन बोलतात येविसीची आज्ञा

२०० लखुसेट गुजर मयेत पुतण्या गणेश सेट हजीर नाही

७२५ खत्री याचे देणे व येण्याचे लढे

१०० पुतलाजी रेडा
 ७० वेढ्या समई
 ३० आनावी ? बाबत
 ———
 १००

१२५ गणपत तुकाजी
 वेढ्या समई

५०० त्रिंबक वासुदेव
 १५० वेढया समई
 ३५० वेडा उठून गेल्यावर घेतले
 ———
 ५००

———
७२५

सदरहु आसामी कडेस लढे

१४२८ सोन्याची ४
 वजन ८८३॥
 दर १७ प्रा

१७५ रुप्याची ७
 वजन ८८७
 दर ! आदमासे १७५

———
१६०३

सदरहु अैवज सिबंदीचे देण्यास द्यावा किंवा नाही येविसीची आज्ञा

तालुके मजकुरी आलियावर मनास आणिता सदरहु अन्वये लढ्याची कलमे वगैरे मजकुराची कलमे लिहिली आहेत कागदपत्र मोसब्यास पुण्यास येथे आडचण पडते सारांष राजश्री कृष्णाजी बाबा फडणीस येथे आलियाविना सिबंदी वगैर कोण्हाची समजूत व्हावयाची नाही आज्ञापत्र येईल त्याप्रो फडशांत आणितो

( दुसरा कागद पूर्ण. पुढील कागद नष्ट* )

———

ले. ८५ नकल | श्री | शके १६९८ पौष शु॥ १३ इ. स. १७७७ जाने. २१

राजश्री देशाधिकारी व लेखक वर्तमान व भावी ता॥ झिराड सुभा प्रा॥ चेऊल गो॥ यांसि

र्द अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्ये श्रो॥ माधवराव नारायेण प्रधान आशीर्वाद व नमस्कार सु॥ सबा सबैन मयां व अलफ शके १६९८ दुर्मुखी नाम संवत्सरे राजश्री राघोजी आंगरे वजारतमाब सरखेल याणी निवेदन केले की श्री (मो. जा.)देव कनकेश्वर पर्वतवासी वा॥ नजीक मापगाव ता॥ मार याचे पूजा नैव्यद्य नंदादीप व अन्नछत्र व नगारखाना व इमारतीचे खर्चास मौजे

सोगांव ता। मजकूर येथील निमे अमल आम्हीं आपले तर्फेचा हालीं नूतन इनाम दिल्हा आहे व निमे अमल सरकारांत आहे तो आपण श्रीकडे सदरहु खर्चास नूतन इनाम करार करून देऊन दरोबस्त गांवची भोगवटीयास पत्रें करून दिल्हीं पाहिजेत म्हणोन त्याजवरून मनांस आणितां श्रीदेव याचे पूजा नैव्यद्य नंदादीप व अन्नछत्र व नगारखाना व इमारतींचे खर्चास मौजे मजकूर येथील निमे अमल सरखेल यांणीं आपले तर्फेन नूतन इनाम दिल्हा आहे व निमे अमल सरकारचा आहे त्यास श्री देव महा जागृत स्थांन याची पूजा नैव्यद्य नदादीप वगैर चालविल्या राज्यास श्रेयस्कर हे जाणोन सरकार-तर्फेचा निमे अमल सरकारांतून नूतन इनाम दिल्हा येकूण मौजे मार दुतर्फा कुलबाब कुलकानु हालीपटी व पेस्तरपटी जलतरुतृणकाष्टपाषाण निधि-निपेक्षसहित खेरीज हकदार व इनामदार करून दरोबस्त श्रीकडे इनाम करार करून देऊन हें पत्र तुम्हांस सादर केले असे तरी मौजे मार आंगरे सरखेल याचे तर्फेनें श्रीचे सदरहु खर्चाच्या बंदोबस्तास येईल त्याचे दुमाला करून देऊंन श्रीकडे इनाम चालवणे प्रतिवर्षी नवीन पत्राचा आक्षेप न करणे या पत्राची प्रती लेहून घेऊंन हे असल पत्र त्याजवल भोगवटीयास परतोन देणे जाणिजे छ ११ जिल्हेज आज्ञाप्रमाणं

---

ले. ८६ नकल } श्री { शके १६९८ फाल्गुन वा। १४ इ. स. १७७७ एप्रिल ६

राजश्री बाबूराव कृष्ण कोलटकर गोसावी यांसि

र्द अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य (मो.जा.) श्री राघोजी आंगरे वजारतमाब सरखेल रामराम उपरि येथील कुशल जाणोन स्वकीये कुशल लिहीत गेले पाहिजे विशष मौजे सोगाव ता। झिराड प्रांत चेऊल हा गाव निमे राजश्री (मो.जा.) पंत प्रधान याजकडोन व निमे सरकार तर्फेने येकूण दुतर्फा दरो-बस्त इनाम तुम्हाकडे होता तो हाली साल मारापासून दूर करून श्री(मो.जा.) पर्वत वासी सनिध मौजे मापगाव ता। मार याच्या पूजा नैव्यद्ये नंदादीप व चौघडा वगैरे खर्चाबद्दल नूतन इनाम करार करून दिल्हा असे तरी मौजे मजकूरची देखरेख तुम्ही न करावी आकार प्रमाणे श्री (मो. जा.) कडे खर्च पडत जाईल जाणिजे छ २७ माहे सफर बहुत काये लिहिणे

( कागदावर मार्गे* ) असल बमोजीब नकल हस्ताक्षरे जिवाजी करेराऊत पाटेल मौ मापगांव तो झिराड कारकून दि। राजश्री गोविंदसेट रेवादास असल पत्र सेट मशारनिलेकडे असे सु॥ समानीन मया व अलफ नकल.

---

# व्यक्ति-स्थल सूचि

## [ दिलेले आंकडे लेखांचे आहेत ]